


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

सदर प्रकल्पांतर्गत महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे ह्या संस्थेद्वारे प्रकाशित करण्यात येणाऱ्या महाराष्ट्र साहित्य पत्रिका ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात उपरोक्त संस्थेला आवाहनपर विनंती करण्यात आली होती.

सदर विनंती मान्य करून महाराष्ट्र साहित्य परिषदेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. हे अंक सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका








२७७२

अंक १, २, ३, ४

संपादक — प्रा. रामचंद्र श्रीपाद जोग

वर्ष १६वे अंक १ला (६५) जानेवारी १९४३
वर्ष १६वे अंक २रा (६६) एप्रिल १९४३
वर्ष १६वे अंक ३रा (६७) जुलै १९४३
वर्ष १६वे अंक ४था (६८) ऑक्टोबर १९४३





महाराष्ट्र-साहित्य-परिषद्

# महाराष्ट्र-साहित्य-पत्रिका

[त्रैमासिक]

## ६७

संपादक—प्रा. रामचंद्र श्रीपाद जोग
एम्.ए.

आषाढ १८६५

वर्ष १६ वें] जुलै १९४३ [अंक २ रा



अनुक्रमणिका





# महाराष्ट्र-साहित्य-पत्रिका



वर्ष १६ वें ]

## अनुक्रमणिका

[ अंक २ रा

(अंक ६७)



---

## सभासदांस सूचना

१ बाकीदार सभासदांनीं आपली वर्गणी सत्वर पाठवावी अशी विनंती आहे. ऑक्टोबरपावेतो वर्गणी न आल्यास व्ही. पी. चा मार्ग अनुसरावा लागेल.

२ सभासदांकडून संमेलनाच्या अध्यक्षपदासाठी नांवें परिषदेकडे सुचवावयाचीं असतात. हें संमेलन नोव्हेंबरच्या सुरुवातीस भरविण्यांत येणार असल्याचें सांगलीकरांकडून निश्चित कळलें आहे. तरी सभासदांस विनंती की अध्यक्षपदासाठी सुचविवयाचीं नांवें ता. ३१ ऑगस्टपावेतो कार्यालयांत पाठवावीं.

३ मलपृष्ठ ३ वरील योजनेकडे सभासदांनी अवश्य लक्ष्य द्यावें.

चिटणीस
म. सा. परिषद्

# महाराष्ट्र-साहित्य-पत्रिका



## देवांना आम्ही जन्म देणार—



"आम्ही विश्वकुटुंबवादी लोक मनुष्यस्वभावाविषयी आशावादी आहोंत. तुम्ही लोक निराशावादी म्हणूनच तुम्ही देवावर विश्वास ठेवतां. मनुष्य कांहीं श्रेष्ठ उच्चतम गोष्टी करणार नाही. देवाने त्या त्याच्याकरिता करावयाच्या, किंवा त्याच्याकडून करवावयाच्या असें तुमचें तत्त्वज्ञान. आम्ही मनुष्यप्रयत्नावर विश्वास ठेवतों. मनुष्य हा केवळ स्वार्थैकतत्परबुद्धियुक्त पशु आहे असें तुम्हांला वाटतें. आम्हांला त्याच्यांत पशुत्वाचा अंश आहे असें वाटतें, पण तो देव होऊं शकेल— नराचा नारायण होऊं शकेल— असेंहि वाटतें. मनुष्य पूर्वी सत्ययुगांत देवतुल्य होता, देवांमध्ये बोलतचालत होता, असें तुम्हांला वाटतें. आमच्या मतें सत्ययुग अजून यावयाचें आहे. आणि तें आलें की मनुष्य देवासारखा होईल. त्या वेळचे आदर्शभूत लोक म्हणजे आमचे देव. हे देव अद्यापि उत्पन्न व्हावयाचे आहेत. त्यांना अवतार आमच्याच पोटीं व्हावयाचा आहे. तुम्हांला वाटतें देव आम्हांला उत्पन्न करतो; आम्ही म्हणणार देवांना आम्ही जन्म देणार. निदान आमची तशी इच्छा आहे." —सुशीलेचा देव, पृ.२६७.

प्रा. वामन मल्हार जोशी

अनुक्रमणिका

# ज्ञानेश्वरांचा तोतया



[लेखक- डॉ. शं. दा. पेंडसे]

[भूमिकाः- १९१४ सालीं 'श्रीज्ञानेश्वरमहाराजांचें योगवासिष्ठ' याचें प्रकाशन. तें ज्ञानेश्वरांचें अशी संपादक कै. चांदोरकर यांची भावना. गोविंदसुत आणि श्री. परांजपे यांचें मत अनुकूल. कै. गुलाबराव महाराज, कै. जोगमहाराज, कै. पांगारकर यांचीं मतें प्रतिकूल. 'मुमुक्षू'मध्ये यांनी केलेल्या चर्चेने सं. चांदोरकर व प्रकाशक श्री. देव यांचें समाधान.

पुढे वीस वर्षांनी श्री. य. खु. देशपांडे 'श्रीज्ञानेश्वर आणि महानुभाव' (ज्ञानेश्वरदर्शन) या लेखांत प्रस्तुत ग्रंथ महानुभावाचा नव्हे असें कै. गुलाबराव महाराज यांच्या एका विधानास अुत्तर देतात. मुख्य रोख याच मुद्यावर पण अनुषंगाने प्रस्तुत ग्रंथ ज्ञानेश्वरांचा असण्यास प्रत्यवाय नाही असें सुचवितात.

१९४३ सा. पत्रिका, अंक ६५. श्री. अ. का. प्रियोळकर प्रस्तुत ग्रंथ ज्ञानेश्वरांचा असावा असें प्रतिपादन करितात व त्या प्रतिपादनांत डॉ. पेंडसे यांच्या 'ज्ञानेश्वरांचें तत्त्वज्ञान' या प्रबंधांतील अेतद्विषयक विधानांचा परामर्श घेतात— त्यावर डॉ. पेंडसे लिहितात—]

(१) श्री. प्रियोळकर यांना १९१४ सालीं मुमुक्षूंत या विषयावर प्रसिद्ध झालेले कै. गुलाबराव महाराज, पांगारकर व जोग यांचे लेख वाचावयास मिळाले नाहीत. ते वाचून त्यांचें मत बदललें असतें असें नाही. तथापि 'प्रस्तुत योगवासिष्ठ ज्ञानेश्वरांचें नव्हे हें सिद्ध करण्याकरितां वरील तीन गृहस्थांनी दिलेल्या कारणांपैकी कांही कारणें त्यांना विचारणीय वाटलीं असतीं. श्री. देशपांडे यांनी या लेखांचा जो सारांश दिला आहे त्यावरून या वादाची बहुतेक कल्पना येते हें खरें आहे. तथापि त्यांनी उद्धृत न केलेलीं कांही विचारणीय कारणें पुढे देतों— कै. गुलाबराव महाराज यांनी (१) ज्ञानेश्वरींत आत्मोपासनेची प्रशंसा केली आहे तर या योगवासिष्ठांत युगधर्मप्रकरणांत तिची व्यावृत्ति केली आहे असें १६ जुलै १९१४ या मुमुक्षूच्या अंकांत दाखविलें आहे. (त्रेतायुगांतील 'मुक्ति' या धर्मांविषयीहि असाच विरोध ज्ञानेश्वरी आणि योगवासिष्ठ यांत दाखवितां येअील.) (२) योगवासिष्ठाच्या ९ व्या अध्यायांत १९ ते २३ ओव्यांत परवस्तूपासून पृथ्वीपर्यंतची सृष्ट्युत्पत्ति कशी झाली याचा जो क्रम दिला आहे तो वेदान्तांत कुठेहि दिलेला नाही. (या ओव्यांवरील टीपेंत कै. चांदोरकर यांनी ज्ञानेश्वरी अ. ६ श्लोक १४ वरील टीकेचा हवाला दिला आहे पण त्या टीकेंतहि हा सृष्टीच्या अुत्पत्तीचा क्रम आढळत नाही.) (३) सातव्या अध्यायांतील १४ व्या ओवींत यम-नियमांचा कर्मयोगांत समावेश केला असून तो पवनानें साधतो असें ११ व्या ओवींत सांगितलें आहे. हा प्रकार ज्ञानेश्वरींत आढळत नाही. (या ओवीवरील टीपेंत कै. चांदोरकरांनी 'मन-पवन अेकच असल्याने कर्म-हठयोग अेकच होत असें विधान केलें आहे. तेंहि वादग्रस्तच आहे.) ६ आगस्ट १९१४ च्या मुमुक्षूंत वरील तीन कारणांशिवाय आणखीहि कांही कारणें कै. गुलाबरावांनी दिलीं आहेत तीं सोडलीं तरी वरील तीन कारणें व तदनुषंगानें कंसांत प्रस्तुत

अनुक्रमणिका

लेखकाने दिलेल्या गोष्टींचा विचार झाला पाहिजे. ३० जुलै १९१४ च्या मुमुक्षूंत कै. पांगारकरांनी या विषयावर अग्रलेख लिहून हें योगवासिष्ठ ज्ञानेश्वरांचें नसण्याचीं जीं कारणें दिलीं त्यांपैकी पुढील कारणें विचारणीय आहेत. (१) मूळ संस्कृत श्लोक व त्यावर टीका असा क्रम ज्ञानेश्वरींत दिसतो तसा योगवासिष्ठांत नाही. कांही महत्त्वाचे श्लोक निवडून त्यांवर टीका करावयास पाहिजे होती. (२) गृहस्थाश्रमाची योगवासिष्ठांत केलेली निंदा ज्ञानेश्वरीशीं विसंगत आहे. आसक्तिरहित कर्मांचा पुरस्कार पुढील ओव्यांत ज्ञानेश्वरींत आहे. आतां गृहादीक आघवें। कांहींच नलगे त्यजावें। जें घेतें जालें स्वभावें। निःसंगु म्हणौनि ॥ज्ञा. ५-२२॥ म्हणोनि अग्निसेवा न संडितां। कर्मरेखा नोलंडितां। आथि योगसुखं स्वभावतां। आपणपांचि ॥ज्ञा. ६-५१. याशिवाय विहित कर्मांची थोरवी आणि आवश्यकता प्रतिपादिणाऱ्या ज्ञा. अ. ३-४५ ते १३० या ओव्याहि या ठिकाणीं लक्षांत घेण्यासारख्या आहेत. (३) अ. ६ ओवी १३० ते १३२ मध्ये मराठी योगवासिष्ठांत वृद्ध काश्यप हा ओक नवीनच योगशास्त्रकर्ता अुल्लेखिला असून त्याने, याज्ञवल्क्याने व भगवंतांनी दर्शनांचा संवाद व युगधर्मभेद सांगितला नाही आणि गृहस्थधर्माचा निषेध केला नाही म्हणून वसिष्ठाच्या तुलनेने त्यांचा अधिक्षेप केला आहे व शिष्याला अुपदेश करावा तर तो वसिष्ठांनीच असें प्रतिपादिलें आहे. ज्ञानेश्वरीकार ज्ञानेश्वर असें प्रतिपादन करतील हें शक्य दिसत नाही. हीं कै. पांगारकरांचीं तीनहि कारणें विचारणीय आहेत. ओकच ग्रंथकार आपल्या निरनिराळ्या ग्रंथांत परस्परविरोधी गोष्टी सांगेल तर तो जिज्ञासु व मुमुक्षु वाचकांना गोंधळांत पाडील. ज्ञानेश्वरांचेच म्हणून १ ज्ञानेश्वरी, २ अमृतानुभव आणि ३ चांगदेवपासष्टि हे जे तीन सर्वमान्य ग्रंथ आहेत त्यांतील तत्त्वज्ञानांत परस्परविरोध कुठेच आढळत नाही. जे ज्ञानेश्वरांचे अभंग आहेत त्यांतील तत्त्वज्ञान वरील तीनहि ग्रंथांशीं सुसंगत आहे. अशा स्थितींत या चार ग्रंथांत सांगितलेल्या गोष्टींशीं विरोधी गोष्टी पांचव्या ग्रंथांत सांगून ज्ञानेश्वर वाचकांचा बुद्धिभेद करतील हें संभवत नाही. पण श्री. देशपांडे यांना वरील कारणें पटलेलीं नाहीत म्हणून त्यांच्या म्हणण्याचा थोडक्यांत विचार करूं.

१ चौहिं युगधर्मीं वर्ततां। मोक्षु नाहिं सर्वथा (यो. वा. ५-३७) ही कल्पना ज्ञानेश्वरींत ३-१० व ११ श्लोकांवरील टीकेंत आणि ११-४८ या श्लोकावरील टीकेंत आढळते असें श्री देशपांडे यांचें म्हणणें आहे. योगवासिष्ठांत सांगितलेले चार युगांचे धर्म पुढीलप्रमाणे आहेतः— कृतयुगांत आत्मअुपास्ति, त्रेतायुगांत मुक्ति, द्वापारांत यज्ञ आणि कलियुगांत तीर्थयात्रा-व्रतदान हे धर्म आहेत, व या चारहि धर्मांनी मोक्ष प्राप्त होत नाही असें यो. वा. कारांचें म्हणणें आहे (यो. वा. ५-२०, २४, ३०, ३३). ज्ञानेश्वरी ३-१० व ११ श्लोकांवरील टीका पाहिली तर त्यांत "तुम्हां वर्णविशेषवशें। आम्ही यज्ञु स्वधर्मु विहिला असे। ओयातें अुपासा मग आपैसे। काम पुरती॥ ३ ८८॥ स्वधर्मयज्ञ यजावे। अनायासें॥ ३-९१॥ असा वर्णप्राप्त स्वधर्मयज्ञाने देवांना संतुष्ट करण्याचा अुपदेश केला आहे; यज्ञाचा निषेध केलेला नाही. ज्ञानेश्वरींत ११-४८ श्लोकावरील टीकेंत अीश्वराच्या सगुण स्वरूपाचें दर्शन यज्ञयागांनी किंवा योगाने होणारें नसून ध्यानाने होणारें आहे असें सांगितलें असलें तरी त्याचें "चौहिं युगधर्मीं वर्ततां। मोक्षु नाहिं सर्वथा। आत्मज्ञानेविण रघुनाथा। निश्चिता नोहिचे॥ यो. वा. ५-३७॥ या सिद्धान्ताशीं साम्य नाही. कारण अीश्वराच्या सगुणस्वरूपाचा साक्षात्कार व्हावा अशी अिच्छा असेल तर ध्यानावांचून अितर यज्ञयाग, योग, सत्कर्मे अित्यादि साधनें व्यर्थ आहेत असें ११-४८ या गीताश्लोकावरील टीकेंत ज्ञानेश्वरांनी सांगितलें आहे, तर योगवासिष्ठांत मोक्षाकरिता आत्मज्ञानावांचून अितर साधनें व्यर्थ आहेत असें सांगितलें

आहे. अेकांत-सगुणस्वरूपाचें दर्शन हें ध्येय आहे, तर अेकांत आत्मज्ञानाने प्राप्त होणारा मोक्ष म्हणजे निर्गुणस्वरूपप्राप्ति हें ध्येय असल्यामुळे साम्य नाही.

२ "हा ग्रंथ महानुभावाशिवाय आणखी कोणीतरी ज्ञानदेवाच्या नांवावर दडपून दिला असेल याला तरी काय हेतु सांगतां येअील" असा प्रश्न श्री. देशपांडे विचारतात. या दडपादडपीचे अनेक हेतु सांगतां येतील. लोकादरास पात्र झालेल्या सुप्रसिद्ध व्यक्तीच्या नांवाने ग्रंथरचना केल्यास त्याचा प्रसार होणें सुलभ जातें व अेरवी जें कवित्व लोकांनी हातींहि घेतलें नसतें तें मोठ्याच्या नांवावर असल्यामुळे लोक निदान वाचतात व अशा वाचकांपैकी कांही-जण तरी गळाला लागतात. जीं मतें स्वतः प्रतिपादन केलीं असतां लोक अैकणार नाहीत तीं मोठ्याच्या नांवें प्रसिद्धिलीं तर लोक आरंभीं तरी अैकून घेतात. स्वेतरपंथीयांचा बुद्धिभेद करणें असेल तर त्या पंथाच्या आचार्यांच्या नांवावर भलतीं किंवा स्वपंथीय मतें दडपून देणें हाहि सुलभ अुपाय असतो. अशा अनेकविध हेतूंनी वाङ्मयांतील ही दडपादडपी चालते. नाहीतर ज्ञानेश्वरींत प्रक्षिप्त ओव्या शिरून त्या काढण्याचा खटाटोप अेकनाथांना कशाला करावा लागला असता ? व ज्ञानेश्वरांच्या अभंगांत त्यांच्या नांवावर शेकडो अभंग कसे दडपले गेले असते ? थोडेंसें साम्य दाखवून दरेंचसें वैपम्य पचविण्याच्या हेतूनेहि ही दडपादडपी केली जाते. आणि कित्येक वेळां केवळ नामसादृश्यामुळेहि अेकाचे ग्रंथ दुसऱ्याचे समजले जातात; दडपा-दडपीचा हेतु त्यांत नसतो.

३ या दडपादडपीचें कारण श्री. देशपांडे यांच्या लेखांतच सांपडण्यासारखें आहे. हा ग्रंथ भागवतधर्मीयांकरिता लिहिलेला नाही. यांत भागवतधर्माचीं तत्त्वें गोविलीं नाहीत असें श्री. देशपांडेच म्हणतात. तेव्हा ज्यांत भागवतधर्माचीं तत्त्वें नाहीत असा ग्रंथ भागवतधर्मीयां-कडून वाचला जावा या हेतूनेच तो ज्ञानेश्वरांच्या नांवावर लिहिला गेला असावा हें अुघड आहे.

४ हा ग्रंथ भागवतधर्माचा नाही हें मान्य करूनहि "तो वाचीत असतां विपमतेपेक्षा साम्याचेंच प्राबल्य जास्त वाटून हा ग्रंथ श्रीज्ञानेश्वरांचाच असा मनाचा विश्वास बसतो" असें श्री. देशपांडे लिहितात. "ज्ञानेश्वरांची भाषापद्धति, विचारसरणी, प्रसाद, ओवीची मांडणी अित्यादि या ग्रंथांत दिसत नाहीं या आक्षेपासंबंधीं मतभेद होण्याचा संभव आहे" असेंहि ते म्हणतात. पण या दोन्ही गोष्टींना त्यांनी पुरावा दिला नसल्यामुळे त्याचा विचार करतां येत नाही.

आता श्री. प्रियोळकर यांना ज्या कारणांमुळे हें योगवासिष्ठ ज्ञानेश्वरांचें वाटतें त्यांचा विचार करूं. (१) ज्ञानेश्वरी व योगवासिष्ठ यांच्या कर्त्यांचें नाम, पितृनाम व गुरुपरंपरा अेक आहे अेवढ्याने त्या दोन्ही व्यक्ति अेक आहेत हें सिद्ध होत नाही. अेकाच गोत्राचे किंवा आडनांवाचे व स्वतःचें आणि वडिलांचें नांव सारखें असणारे अनेक गृहस्थ आजहि आढळून येतील. सकृद्दर्शनीं ते अेक आहेत असें भासलें तरी समान नांवाच्या त्या दोन्ही व्यक्ति भिन्न असतात. (२) समान शब्द, समान कल्पना व सारख्याच चरणांनीहि अेकव्यक्तित्वच सिद्ध होअील असें नाही. ज्ञानेश्वरांच्या नांवावर खपण्याकरिता त्यांच्या नांवाची अुसनवारी करणारा गृहस्थ त्यांचे शब्द, कल्पना व कांही ओव्याहि चोरील व (३) त्यांचा दुसरा प्रसिद्ध ग्रंथहि आपणच लिहिला आहे असें मुद्दामच सांगेल हें सहज शक्य आहे. किंबहुना या गोष्टी कर-ण्याची दक्षता योगवासिष्ठकाराने दाखविल्यामुळेच हा वाद अुत्पन्न झाला आहे. अितर पुरा-व्याने हे दोन्ही ग्रंथ अेकाच व्यक्तीने लिहिल्याचें जोपर्यंत सिद्ध होत नाही तोपर्यंत वरील गोष्टींना स्वयंसिद्ध असें महत्त्व पुराव्याच्या दृष्टीने नाही. हा सर्व पुरावा मुद्दाम बनावट केला

आहे असें कै. जोग यांनी म्हटलेंच आहे. (४) ज्ञानेश्वरांनी योगवासिष्ठावर ग्रंथ लिहिला आहे असे अुल्लेख अितर कवींच्या ग्रंथांत सांपडतात, अेवढ्यावरून प्रस्तुत योगवासिष्ठ हेंच ज्ञानेश्वरीकार ज्ञानेश्वरांचें असें सिद्ध होत नाहीं. ज्ञानेश्वरांच्या नांवावर दोनतीन योगवासिष्ठें प्रचलित आहेत. कै. भिंगारकरांच्या ज्ञानेश्वरचरित्रांत अुल्लेखिलेलें योगवासिष्ठ या योगवासिष्ठाहून निराळें असावें. कारण त्यांतील नमनाच्या आरंभींच्या ओव्या निराळ्या आहेत. ज्ञानेश्वरांच्या नांवावर 'पंचीकरण' नांवाचा जो ग्रंथ आहे त्यांत अष्टदलकमलाचें वर्णन करणाऱ्या ओव्यांचा स्वतंत्र विभाग करून शेवटच्या ओवींत 'वसिष्ठ-रामसंवाद कथने। म्हणे ज्ञानदेवो' असा योगवासिष्ठाचा अुल्लेख केला आहे. त्या ओव्या या योगवासिष्ठांत नसल्यामुळे तें अेक निराळेंच योगवासिष्ठ असण्याचा संभव आहे. कै. राजवाडे यांना ज्ञानदेव-कृत 'वशिष्ठबोध' म्हणून अेक त्रुटित पोथी मिळाली होती व ती योगवासिष्ठाहून भिन्न होती असें त्यांनी नमूद केल्याचें श्री. देशपांडे यांनी लिहिलें आहे. या वशिष्ठबोधांतच भिंगारकरांनी दिलेल्या नमनाच्या ओव्या व 'पंचीकरणां'त अुद्धृत केलेल्या ओव्या असण्याचा आणि ज्ञानेश्वरांच्या नांवावर असणाऱ्या या दोन्ही किंवा तिन्ही पोथ्या ज्ञानेश्वरीकार ज्ञाने-श्वरांच्या नसून दुसऱ्या ज्ञानदेवाच्या असण्याचा संभव आहे. ज्ञानेश्वरांचें योगवासिष्ठ आणखी निराळेंच असेल.

चांदोरकरांच्या योगवासिष्ठाच्या प्रतीची भाषा अेकनाथपूर्वकालीन मराटीच्या स्वरूपांत आहे हें श्री. प्रियोळकरांचें म्हणणेंहि निरपवाद नाहीं. तूं हें सर्वनाम राजवाडे ज्ञानेश्वरींत सर्वत्र दीर्घ आहे तर या योगवासिष्ठांत सर्वत्र ऱ्हस्व आहे. त्यातें (१.२६), त्यासि (१.२८), ज्याचि (१.१६२) हीं रूपें अेकनाथपूर्वकालीन नाहीत. ज्ञानेश्वरकालीन अितर ग्रंथांत 'ळ'कार असला तरी राजवाडेज्ञानेश्वरींत तो नाहीं. योगवासिष्ठांत तो सर्वत्र आहे या पोथींत अशा रीतीने ज्ञानेश्वरकालीन व अेकनाथकालीन रूपांचें मिश्रण असल्यामुळे त्याची संगति लावण्या-करितां कै. चांदोरकरांनी पुढील टीप दिली आहे:— "या पोथींत दोन तऱ्हेचीं पानें आहेत. कांहीं अत्यंत पुराण दिसतात व कांहीं त्या मानाने जरा अर्वाचीन आहेत" (पान २१). अेकनाथकालीन रूपें ज्या पानांवर आहेत तेवढीं जरा अर्वाचीन ठरवून कै. चांदोरकरांनी या विरोधांतून सुटका करून घेतलेली दिसते; पण चांदोरकरांच्या पोथींत अेकाच पानावर कांहीं जुनीं व कांहीं नवीं रूपें दिसतात. त्यांची संगति वरील टीपेने लागत नाहीं. अुदा.— १-२३५ ओवींत 'जयाचा' हें जुनें रूप आहे. २४० व्या ओवींत 'त्यासी' असें नवें रूप आल्यामुळे त्याची वरील टीप देअून संगति लावली आहे. तर लगेच पुढे २४२ व्या ओवींत "तियेचें" असें जुनें रूप आहे. पोथीचें पान कितीहि लहान असलें तरी वरील तीन किंवा दोन ओव्या तरी अेकाच पानावर असल्या पाहिजेत. म्हणून ज्या ठिकाणीं टीप दिली त्याच ठिकाणीं ती निरुपयोगी झाली आहे. श्री. प्रियोळकर यांच्याजवळ असलेल्या पोथींत सर्व रूपें ज्ञानेश्वर-कालीन असावीं असें दिसतें. तसें असेल तर चांदोरकरी प्रतींतील विरोधी रूपांची 'लेखक प्रमाद' म्हणून संगति लावतां येअील.

निमिक्ष (निमेष) शिक्ष (शिष्य) भयार्णकु (भयानक) शास्त्रचिकिछिका (शास्त्रचिकित्सा) दरूसणें (दर्शनें) ज्ञानमूर्तीचीं (ज्ञानामृताची) सारजा (शारदा) विवस्त (व्युत्पन्न) निसंग (निःसंग) सुल्लभु (सुलभ) रुषेश्वरु (ऋषीश्वर) वेथा (व्यथा) मोहोज्वळ (ओज्वळ) देस (दश) अवस्वरीं (अवसरीं) श्रीवस्छ (श्रीवत्स) अिंद्रासणी (अिंद्राणी) नोपें (नहुषें) प्रभु (प्रभ) अहिर्णेसीं (अहर्निशीं) कर्तुत्वें (कर्तृत्व) सोहपें (सोपें) मछर्व (मत्सर) पिअुष (पीयूष) अित्यादि

शब्दरूपें आणि 'तो भिक्षु नको' 'तो सिक्षु कीजे' अित्यादि चौथ्या चरणांची पुनरावृत्ति असलेल्या ओव्यांची रचना रामदासकालीन व रामदासी थाटाची दिसते असें मीं लिहिलें आहे. त्यावरून "हा ग्रंथ रामदासानंतर कोणी तरी बनावट तयार केला" असें मला म्हणावयाचें आहे असा जो तर्क श्री. प्रियोळकर यांनी केला आहे तो बरोबर नाही. हा ग्रंथ ज्ञानेश्वरीकार ज्ञानेश्वरांचा आहे किंवा नाही अेवढ्या अेकाच प्रश्नाचा विचार प्रबंधांत मीं केला आहे. अमृतानुभवापेक्षाहि थोडा मोठा असलेला हा ग्रंथ ज्ञानेश्वरांचा असता तर त्यांतील तत्त्वज्ञानाचा विचार प्रबंधांत करणें अवश्य होतें. म्हणून या ग्रंथाविषयीच्या दोन्ही बाजू वाचून त्याचें परीक्षण केलें तेव्हा तो ज्ञानेश्वरीकार ज्ञानेश्वरांचा नव्हे असें मला आढळून आलें. हा ग्रंथ महानुभावांनी किंवा दुसऱ्या कोणी व केव्हां केला आहे याविषयी प्रबंधांत मीं विचार केलेला नाही. 'रामदासकालीन' शब्दाचा 'रामदासानंतर' असा जो अर्थ श्री. प्रियोळकर यांनी केला आहे त्याबद्दल माझा मुळीच आक्षेप नाही. कारण 'रामदासकाल' हा शब्द अेका विशिष्ट कालखंडाचा वाचक म्हणूनच मीं योजला आहे. त्यांत रामदासानंतरच्या कांही कालाचा जसा समावेश होतो तसा रामदासाच्या पूर्वीचाहि कांही काल येतो अेवढें लक्षांत घेतलें म्हणजे खिस्तपुराणाच्या पुराव्याची आवश्यकता राहत नाहीं. बाकी योगवासिष्ठ आणि खिस्तपुराण या दोन ग्रंथांतील जे दोन अुतारे श्री. प्रियोळकर यांनी दिले आहेत त्यांतील भाषा आणि वर्णनशैली यांत जें विलक्षण साम्य आढळून येतें त्यामुळे योगवासिष्ठाच्या काळाविषयी अंदाज करण्यास बरेंच साहाय्य होतें यांत शंका नाही.

योगवासिष्ठांतील 'आरजा' (१–३७) शब्द संबंध ज्ञानेश्वरींत नाही. दासबोधांत आहे अशी टीप कै. चांदोरकरांनी दिली आहे. अनुप्रासयुक्त पण लालित्यरहित शब्दयोजनेचें साम्यहि योगवासिष्ठ आणि दासबोध यांत दाखविता येअील. अुदाहरणार्थ पुढील ओव्या पाहाः— धुर्मट्‌ आणि वाजट्‌ । निःसत्व निद्रितु अव्हाटु । अज्ञानु अपसरु झटु । तो त्यजावा ॥ यो. वा. २-२९ ॥ दुष्ट दुर्जनु शोषी । आहाव आधरु असंतोषी । शठू संशयात्मकु दोषी । दीर्घक्रोधी ॥३०॥ वाअीट शिष्यांच्या या वर्णनाशीं दासबोधांतील कुविद्यालक्षणाच्या पुढील ओव्यांची तुलना करण्यासारखी आहेः— शठ शुंभ कातरु । लंड तगुंड सिंतरु । बंड पाषांड तस्करु । अपहारकर्ता ॥ २-३–२९ ॥ धीट सैराट मोकाट । चाट चावट वाजट । थोड अुद्धट लंपट । बटवाल कुबुद्धी ॥ ३० ॥ ज्या कालखंडाला 'रामदासकाल' असें नांव देतां येअील त्या कालांत प्रचलित असलेली शैली योगवासिष्ठांत दिसते अेवढीच वस्तुस्थिति या अुदाहरणांनी वाचकांच्या नजरेस आणावयाची आहे.

आता अभिनव-वाग्विलासिनी । जि चातुर्य कलाकामिनी । ते शारदा विश्वमोहिनी । नमिली मियां ॥ ज्ञा. १-२१ ॥ या अेकाच ओवीने ज्ञानेश्वरींत शारदेला नमन ज्ञानेश्वरांनी केलें आहे. सर्व वाङ्मयगुणांनी संपन्न असलेल्या या अेकाच लालित्यपूर्ण ओवींतील अर्थगांभीर्य व सौंदर्य योगवासिष्ठांत चौतीस ओव्यांनी केलेल्या 'सारजे'च्या नमनांत कुठेहि आढळत नाही. कवीला गजानन प्रसन्न होअून 'म्हणे ज्ञानदेवा आरजा । नमीं तुं ब्रह्मतनया शारजा ॥ १-३७ ॥' असें म्हणत आहे. "कवीने अशा प्रकारें मोठा 'ड्रामाटिक' प्रस्ताव केला आहे असें श्री. प्रियोळकर म्हणतात तें अेका अर्थी खरें आहे. ग्रंथकार खरोखरच नाटकी असून स्वतः ज्ञानेश्वर असल्याचा नाटकी आविर्भाव त्याने बराच केला आहे यांत शंका नाही. पण त्यामुळे ग्रंथकार ज्ञानेश्वर नसून ज्ञानेश्वरांचें त्याने सोंग घेतलें आहे ही गोष्ट वाचक-प्रेक्षकांच्या लक्षांत आल्यावांचून राहत नाही हेंहि तितकेंच खरें आहे.

'ज्ञानेश्वरीमध्ये जो ज्ञानेश्वरांच्या काव्यकल्पनेचा किंवा शब्दचातुर्याचा विलास दृष्टीस पडतो तसा किंवा तितका योगवासिष्ठांत नाही' ही गोष्ट श्री. प्रियोळकर यांस कबूल असूनहि हें योगवासिष्ठ ज्ञानेश्वरांचें ठरविण्याकरिता त्यांनी जो युक्तिवाद केला आहे तो पटण्यासारखा नाही. सातशे श्लोकांवर नअू हजार ओव्यांची ज्ञानेश्वरी आणि बत्तीस हजार श्लोकांवर अकराशे तेवीस ओव्यांचें योगवासिष्ठ यांची तुलना कशी होअू शकेल असा श्री. प्रियोळकरांचा प्रश्न आहे. पण अेक ग्रंथ विस्तारात्मक आणि अेक संक्षेपात्मक असल्यामुळे तुलनेकरिता लागणारा सामान्य धर्म त्यांत नाही असें सकृद्दर्शनीं जें भासतें तें खरें नाही. मूळ संस्कृतांत असणाऱ्या ग्रंथांवर विवेचनात्मक टीका हा दोन्ही ग्रंथांचा सामान्य धर्म आहे. गीतेच्या सातशे श्लोकांवर टीका करतांना कोणत्या गोष्टींचें संक्षिप्त व कोणत्या गोष्टींचें सविस्तर विवेचन करावयाचें याची निवड ज्ञानेश्वरांना करावीच लागली व ती करतांना जी अभिरुचि प्रकट झाली ती योगवासिष्ठावर टीका करतांनाहि प्रकट झालेली दिसली पाहिजे.

योगवासिष्ठाचा संक्षेप करावयाचा म्हणजे त्यांतील कांही क्षुल्लक गोष्टी अजिबात गाळावयाच्या, कांहींचा अतिसंक्षिप्त निर्देश करावयाचा व कांही महत्त्वाच्या गोष्टींचा विस्तार अेकंदर ओवीसंख्येच्या प्रमाणांत करावयाचा. याकरिता योगवासिष्ठांतील विषयांची निवड काळजीपूर्वक केली पाहिजे. तेव्हा संक्षेप-विस्ताराकरिता केलेली विषयांची निवड, त्यांत दिसणारी अभिरुचि आणि संकल्पित ओवीसंख्येच्या प्रमाणांत त्या त्या विषयाचें केलेलें कमीजास्त विवेचन यांच्या दृष्टीने दोन्ही ग्रंथांची तुलना करणें मुळीच अशक्य नाही. ज्ञानेश्वरांच्या कर्तृत्वावर हक्क सांगणाऱ्या कोणत्याहि ग्रंथाने अशा तुलनेला तयार असलें पाहिजे.

अमृताला जिंकण्याची प्रतिज्ञा करून 'अैन अुमेदींत' ज्ञानेश्वरांनी गीतेवर टीका लिहिली व त्याप्रमाणे तो ग्रंथ सरस अुतरलाहि' असें श्री. प्रियोळकर म्हणतात. ज्ञानेश्वरी सरस अुतरली तसें व तितकें योगवासिष्ठ सरस अुतरलें नाही याचीं कारणें या वाक्यांत प्रियोळकरांनी सांगितलेलीं दिसतात. पण प्रतिज्ञा केल्याने ग्रंथ सरस किंवा नीरस अुतरतात हा कार्यकारणभाव असिद्ध आहे. योगवासिष्ठ ग्रंथ नीरस करण्याची प्रतिज्ञा करून कांही लिहिलेला नाही. अुलट त्यांत popular मांडणी करण्याचा प्रयत्न केला आहे असें श्री. प्रियोळकर म्हणतात. आणि तरीहि तो ज्ञानेश्वरीअितका सरस अुतरला नाही हें त्यांनाहि मान्यच आहे. ज्ञानेश्वरी अैन अुमेदींत लिहिली म्हणून सरस झाली व योगवासिष्ठ म्हातारपणीं लिहिलें म्हणून नीरस झालें असाहि प्रकार नाही. कारण ज्ञानेश्वरांचें सर्व आयुष्यच मुळी २१ किंवा २४ वर्षांचें होतें. 'ज्ञानेश्वरीचें प्रचंडत्व त्याच्या प्रसाराच्या आड येतें ही गोष्ट ज्ञानेश्वरांच्या लक्षांत आली असली पाहिजे' असें प्रियोळकर म्हणतात. योगवासिष्ठ हा लहानसा ग्रंथ लिहिण्याचें कारण या वाक्यांत त्यांना सांगावयाचें असावें. पण ज्ञानेश्वरांची वरील आयुष्यमर्यादा ज्ञानेश्वरीचा प्रसार कमी किंवा जास्त होत आहे हें निदर्शनास येण्याअितकी दीर्घ नव्हती हें सहज लक्षांत येअील. शिवाय ज्ञानेश्वरीनंतर आपलें तत्त्वज्ञान थोडक्यांत मांगणारे अमृतानुभव आणि चांगदेवपांसष्टी हे दोन अेकाहून अेक लहान ग्रंथ त्यांनी लिहिलेच होते. ज्ञानेश्वरी हाच त्यांचा popular ग्रंथ होता व सर्वसामान्य जनतेकरिता तो लिहिला असल्यामुळे त्यांना समजावें म्हणून त्यांतील विवेचन मुद्दाम सविस्तर केलें होतें. त्या ग्रंथाचा प्रचंडपणा त्याच्या प्रसाराला आड आला नव्हता, अुलटा अुपयुक्त ठरला होता. ज्ञानेश्वरीच्या अवाढव्यतेमुळे 'हा ग्रंथराज लुप्त होण्याच्या मार्गाला लागला होता'; परंतु अेकनाथाने देशी भाषेमध्ये नवें चैतन्य ओतलें व 'त्यांच्याच प्रयत्नाने ज्ञानेश्वरीचा पुनरुद्धार झालेला दिसतो. ज्ञानेश्वरीच्या

बाबतींत आलेल्या अनुभवाचा पुढच्या ग्रंथांत ज्ञानदेवांनी अुपयोग केला असावा' ही श्री. प्रियोळकर यांची कल्पना निराधार आहे. अेक तर अेकनाथांच्या काळापर्यंत आपला ग्रंथ लुप्त होण्याच्या मार्गाला लागलेला पाहून त्या अनुभवाचा अुपयोग पुढील ग्रंथांत करणें ज्ञानेश्वरीकार ज्ञानेश्वरांना शक्य नाही. कारण ते ज्ञानेश्वरी लिहिल्यानंतर ७–८ वर्षांनीच समाधिस्थ झाले. तेव्हा या अनुभवाचा अुपयोग करणारा ज्ञानेश्वर अेकनाथांनंतरच झाला असला पाहिजे ही कल्पना अभावितपणें या युक्तिवादांत प्रकट झाली आहे. पण ज्ञानेश्वरी लुप्त होण्याच्या मार्गाला लागली होती ही कल्पनाच मुळांत खरी नाही. महाराष्ट्रांतील सामान्य जनतेला ज्ञानेश्वरी हें अेक निधानच सांपडलें होतें. मराठी भाषेंत भारतीय तत्त्वज्ञानाचें सार सुलभ आणि सुंदर रीतीने सांगणाऱ्या ज्ञानेश्वरीचें स्वागत आणि ज्ञानेश्वरांचा जयजयकार महाराष्ट्रांतील सर्व जातींच्या संतांनी अेकमुखाने आपआपल्या अभंगांतून केला आहे हें तो ग्रंथ लुप्त होण्याचें चिन्ह खास नव्हे. ज्ञानेश्वरांनी ज्ञानेश्वरी ही सर्वसामान्य जनतेकरिता लिहिली, अमृतानुभव हा पंडितांकरिता लिहिला व चांगदेवपासष्टी ही परिणतप्रज्ञ वयोवृद्धांकरिता लिहिली असें दिसतें. ज्ञानेश्वरी लोकप्रिय होअून तिचा प्रसार अितक्या मोठ्या प्रमाणावर झाला की त्या ग्रंथांत अनेक लोकांनी नाना हेतूंनी नवीन नवीन ओव्या ज्ञानेश्वरांच्या नांवावर दडपून दिल्या; आणि लोकांची दिशाभूल करणाऱ्या या शेकडो प्रक्षिप्त ओव्या काढून टाकून ज्ञानेश्वरी शुद्ध स्वरूपांत लोकांना देण्याचें कार्य करणें अेकनाथांना अवश्य वाटलें. अेकनाथांनी केलेल्या ज्ञानेश्वरीच्या पुनरुद्धाराचें स्वरूप असें आहे. ज्या ग्रंथांचा प्रसार व लोकप्रियता पुष्कळ असते त्याच ग्रंथांत प्रक्षेप फार शिरतात हें महाभारतासारख्या ग्रंथावरून लक्षांत येअील. ज्ञानेश्वरीची भाषा ज्ञानेश्वरकालीन लोकांना अवघड वाटत नव्हती. त्या भाषेंत अेकनाथकालापर्यंत जो बदल आपोआप होत गेला तो अेकनाथांनी तसाच ठेविला. कारण ज्ञानेश्वरीची प्रत शुद्ध करण्याच्या त्यांच्या कल्पनेंत, ज्ञानेश्वरकालीन रूपांचा पुनरुद्धार करण्याचा अंतर्भाव होत नव्हता. ज्ञानेश्वरांचे सिद्धान्त लोकांना शुद्ध स्वरूपांत कळावे या गोष्टीला त्यांच्या मतें महत्त्व होतें. ग्रंथशुद्धीकरणाची त्यांची कल्पना 'लोकोपयुक्त' होती. आजची कल्पना (भाषा–) 'शास्त्रोपयुक्त' आहे. लोकांना संस्कृत कळत नाही म्हणून मराठींत ग्रंथ लिहिला. हा ग्रंथहि अनेक शतकांपूर्वीच्या भाषेंतच मुद्दाम ठेवण्याचा प्रयत्न केला तर तो लोकांना पुनः दुर्बोध होअून ग्रंथकाराचा मूळ अुद्देश विफल होअील. म्हणून लोकभाषेंत आपोआप होत जाणारे बदल ग्रंथभाषेंतहि होअू दिले तरी चालेल अेवढेंच नव्हे तर तें आवश्यक आहे अशी अेकनाथादि लोकोपयुक्ततावादी संतांची विचारसरणी होती. भाषाशास्त्रज्ञांची विचारसरणी याच्या अुलट आहे. मूळ ग्रंथाची संहिता जशीच्या तशीच ठेवणें त्यांना भाषेच्या विकासाचा अभ्यास करण्याच्या दृष्टीने व ग्रंथाचा काळ ठरविण्याला अुपयुक्त म्हणून अवश्य वाटतें. जुन्या काळीं या गोष्टींना महत्त्व नसे. ग्रंथकाराचे विचार लोकांना समजावे म्हणून ग्रंथ लिहिले जातात, भाषाशास्त्राच्या अभ्यासाला अुपयोगी पडावे म्हणून नव्हे, ही गोष्ट लक्षांत घेतली तर शुद्धीकरणाच्या वरील दोन कल्पनांपैकी अधिक 'शास्त्रीय' कोणती हें सांगणें कठीण आहे. पांडित्य आणि लोकोपयुक्तत्व यांचा लढा सनातन असल्यामुळें या अप्रस्तुत प्रश्नाची अधिक चर्चा करण्याचें कारण नाही.

ज्ञानेश्वरीचा विस्तार तिच्या प्रसाराच्या आड येतो या अनुभवाचा अुपयोग प्रस्तुत योगवासिष्ठांत त्यांनी केला आहे हें श्री. प्रियोळकर यांचें म्हणणेंहि वस्तुस्थितीला धरून नाही. पहिल्या अध्यायाच्या ३६६ ओव्या आहेत. त्यामुळे विस्तार होतो असें म्हणून दुसरा अध्याय

८३ ओव्यांतच आटोपला आहे असें ते म्हणतात. पण विस्तार प्रसाराला आड येतो हा अनुभव त्यांना योगवासिष्ठाचा पहिला अध्याय लिहिण्यापूर्वीच जर आला होता तर तो ३६६ ओव्यांचा त्यांनी कां केला असा प्रश्न येतो. पहिल्या अध्यायाच्या अनुभवाने शहाणे होऊन दुसरा अध्याय त्यांनी ८३ ओव्यांचा लहान केला असें म्हणावें तर पुढे सहाव्या अध्यायाच्या १४३, नवव्याच्या १०४ व दहाव्याच्या १६४ ओव्या त्यांनी कां रचिल्या याचा अुलगडा होत नाही. बत्तीस हजार श्लोकांचा सारांश आपल्याला हजार-बाराशें ओव्यांत सांगावयाचा आहे हें आरंभींच लक्षांत घेअून विषयांची योग्य निवड करून योगवासिष्ठांतील महत्त्वाचे सिद्धान्त सांगण्याच्या दृष्टीनेच प्रत्येक ओवी लिहावयास पाहिजे होती. येथे पाहावें तो सारा अुलटच प्रकार ! पहिल्या अध्यायाच्या पहिल्या ८४ ओव्या नमनाला देअून "नमनालाच घडाभर तेल" खर्च केलें आहे. ज्ञानेश्वरीसारख्या नअू हजार ओव्यांच्या ग्रंथांत पहिल्या श्लोकावरील टीकेला प्रारंभ होअीपर्यंत ज्ञानेश्वरांनी प्रास्ताविक ८४ ओव्या लिहिल्या आहेत त्याची ही नक्कल दिसते. त्यांत नमनाच्या ओव्या फक्त २७ च आहेत ही गोष्ट योगवासिष्ठकाराने लक्षांत घेतली नाही व मागील अनुभवाचा अुपयोग तर मुळीच केलेला नाही. गुरुस्तुति व गुरूची अनुज्ञा यांना दिलेल्या १३ ओव्या नमनांतच अंतर्भूत केल्या तर जवळ जवळ पहिल्या १०० ओव्या या विषयाला देण्यांत ग्रंथाच्या संक्षिप्त स्वरूपाकडे पूर्ण दुर्लक्ष झालें आहे. या अध्यायाच्या शेवटीं शेवटीं २० ओव्यांत श्रोत्यांना विनंती केली आहे त्यावरून "ज्ञानेश्वरीपेक्षा या नव्या ग्रंथाचा कल सर्वसामान्य लोकांचा लक्षवेध करण्यासारखा कां आहे तें कळून येअील" असें श्री. प्रियोळकर म्हणतात. पण ज्ञानेश्वरीच्या नवव्या अध्यायाच्या आरंभीं ३० ओव्यांतहि श्रोत्यांची विनंती घातली असून त्यांतील अेक ओवी जशीच्या तशीच योगवासिष्ठांत घेतली आहे. तेव्हा श्रोत्यांच्या विनंतीवरून सामान्य लोकांचें लक्ष वेधण्याचें अनुमान काढावयाचें झाल्यास तें ज्ञानेश्वरीबाबतहि काढतां येअील. योगवासिष्ठाच्या पहिल्या अध्यायांत १५२ ओव्या ऋर्षीची नामावळी सांगण्यांत खर्च केल्या आहेत. यांत मागील अनुभवाचा अुपयोगहि केलेला नाही व विषय निवडण्यांतील कौशल्यहि नाही व कोणत्या विषयाला किती ओव्या द्याव्या याची प्रमाणबद्धताहि नाही. सर्वांत अधिक म्हणजे ३६६ ओव्या असलेल्या पहिल्या अध्यायाची ही स्थिति आहे. पहिला अध्याय वाचल्याबरोबरच हा ग्रंथ ज्ञानेश्वरांचा नव्हे असें वाचकाला वाटूं लागतें. विषयाच्या कमी-अधिक महत्त्वाच्या मानाने त्याचें विवेचन प्रमाणशीर झालें आहे किंवा नाही हें ठरविण्याकरिता ग्रंथाची अेकंदर ओवीसंख्या लक्षांत घेणें अवश्य आहे असें मला वाटतें. श्री. प्रियोळकरांना तें तितकें महत्त्वाचें वाटत नाही असें दिसतें.

विवरणशैलीमध्ये लेखकाचें व्यक्तित्व व अभिरुचि प्रतिबिंबित झालेली असते. ज्ञानेश्वरीमध्ये गुरुस्तुति, सहाव्या अध्यायांतील योग, तेराव्या अध्यायांतील अमानित्वादि ज्ञानलक्षणें, सोळाव्या अध्यायांतील दैवी संपत्ति, नवव्या व अठराव्या अध्यायांत भक्ति अित्यादि अुदात्त विषयांचीं विस्ताराकरिता निवड केली आहे. आणि योगवासिष्ठकाराने ऋर्षींची नामावळी, शिष्यदूषण, दुर्जननिंदा आणि स्त्रीनिंदा हे विषय विस्ताराकरिता निवडले आहेत. योगवासिष्ठासारख्या प्रचंड ग्रंथाची थोडक्यांत कल्पना देण्याकरिता लिहिलेल्या या ११२४ ओव्यांच्या ग्रंथांत १०० ओव्या नमनाला, १५२ ओव्या ऋर्षींच्या नामावळीला, ११० ओव्या शिष्यदूषण व दुर्जन-दांभिकांच्या आणि दांभिक गुरूंच्या निंदेला व ११२

ओव्या खास स्त्रीनिंदेकरिता दिलेल्या पाहिल्या म्हणजे ४७४ ओव्यांची अशी विल्हेवाट लावणाऱ्या या ग्रंथकाराच्या विषय निवडण्याच्या कौशल्याचें, अभिरुचीचें आणि ज्ञानेश्वरांच्या नांवावर आपला ग्रंथ खपविण्याच्या धाष्टर्याचें कौतुक करावेंसें वाटतें, व राहिलेल्या ६५० ओव्यांत योगवासिष्ठांतील अितर महत्त्वाचे विषय व तत्त्वज्ञान कितपत सांगितलें असेल याचीहि बरीच कल्पना येते.

पुरुषाच्या स्त्रीजातिविषयक विचारोच्चार-आचारांवरून त्याचें व्यक्तिवैशिष्ट्य लक्षांत येतें. सरसकट सर्व स्त्रीजाति हलकी समजणें किंवा ती भोग्य वस्तु समजून तिची प्रशंसा करणें किंवा तिच्या मातृत्वाकडे लक्ष देअून तिजबद्दल आदर बाळगणें यांपैकीं जी प्रवृत्ति पुरुषांत प्रबळ असेल तीवरून त्याचा स्वभाव, अभिरुचि व सुसंस्कृतता कळते. ज्ञानेश्वरीच्या नअू हजार ओव्यांत ज्ञानेश्वरांनी स्त्रीजातीची सरसकट निंदा कोठेहि केलेली नाहीं हें त्यांच्या अभिरुचीचें व विवेचनशैलीचें अेक अत्यंत महत्त्वाचें वैशिष्ट्य आहे. त्यांना निंदा करावयाची असती तर ती करण्याला संधि नव्हती असें नाहीं. "स्त्रियो वैश्यास्तथा शूद्रास्तेऽपि यांति परां गतिम्" (९–३२) या गीताश्लोकावर टीका करतांना वामनपंडितांनी स्त्रीनिंदेची संधि साधलीच कीं नाही ? पण अशा रीतीचें विवेचन ज्ञानेश्वरींत कोठेहि आढळणार नाही. परमार्थाच्या दृष्टीने स्त्री ही पुरुषाच्या मार्गांतील धोंड असली तर पुरुष हा स्त्रीच्या मार्गांतील डोंगर आहे. म्हणून स्त्रीजातीची सरसकट निंदा न करितां ज्ञानेश्वरींत अुलट स्त्रीजातीच्या मातृत्वाचे आणि वत्सलतेचे गोडवे ठिकठिकाणीं प्रेमाने गायिलेले आढळतील. (ज्ञा. २-६१, ३–२९, ८-१२, ९–६, ९–१८, ११–६२५.२६, १३–१४०, १८–९२३-२४ अित्यादि ओव्या पाहाव्या.) बाराव्या अध्यायांत गुरुकृपादृष्टीवर मातेचें सविस्तर रूपक केलें आहे. याशिवाय पतिव्रता स्त्रियांच्या स्तुतीच्या अनेक ओव्या आहेत. ज्ञानेश्वरांच्या या अमृतोपम ओव्या कुठे आणि योगवासिष्ठकाराने सहाव्या अध्यायांत ११२ ओव्यांनी स्त्री-जातीची सरसकट केलेली अभद्र निंदा कुठे ! "ते काळसर्पांची गरळ । मूर्तिमंत हळाळ । ना तरी केवळ अधोगति ।। ६–१२ ।। ते निरयपंकीचा दिवा । अधःपात करावेया जीवा । तेचि जाणे ।। १५ ।। वनिता अज्ञानाची खाणि । भूलि रूपांची लाणि । ना ते मुक्तीसी नागवणि । चांडाळी ते ।। १६ ।। जिचीया संगति । सप्त वेसनें प्राप्त होतीं । जाअिजे अधोगति । पितृें सहित ।। १८ ।। अशा गलिच्छ शिवीगाळीच्या ओव्या किती द्याव्या ? त्यांत प्रकट झालेल्या अभिरुचीला दुरूनच नमस्कार करून पुढे जावें हें बरें. ती चांगली किंवा वाअीट कशीहि असली तरी ती ज्ञानेश्वरीकार ज्ञानेश्वरांची नव्हे अेवढें निश्चित. खरें पाहिलें तर मातेच्या स्तन्याची ज्याला ज्याला आठवण असेल त्याच्याकडून स्त्रीजातीची अशी सरसकट अभद्र निंदा होअूं नये. पण खेदाची गोष्ट अशी की ही आठवण असूनहि (१०–९) प्रस्तुत ग्रंथकाराने ही निंदा केली आहे. आणि योगवासिष्ठांतील वैराग्यप्रकरणांत स्त्रीजुगुप्सावर्णनाच्या २१ व्या सर्गांत जे ३६ श्लोक आहेत त्यांचा ११२ ओव्यांनी विस्तार केला आहे. विस्ताराकरिता निवडलेल्या या विषयावरून या ग्रंथाचें कर्तृत्व ज्ञानेश्वरांकडे देतां येत नाही हें अुघड आहे. शिवराळपणाची हौस योगवासिष्ठकाराला फार दिसते. ग्रंथसमाप्तीच्या वेळीं तरी त्यानें हा मोह आवरला पाहिजे होता. पण तेथेहि या ग्रंथाची शिकवण ज्यांना आवडणार नाही त्यांना कुत्रे, गाढव, डुकर, नरकांतील किडे अित्यादि विशेषणें त्याने दिलीं आहेत. ज्ञानेश्वरांनी ज्ञानेश्वरीच्या अुपसंहारांत शेवटच्या श्लोकावरील टीकेंत असा प्रकार केलेला नाही.

"अनुमर्येवीण विपन्नाच्या वापा। न बोलवे। (१.९१) ही व्युत्पन्नाच्या वापाचा अुद्धार करण्याची शब्दयोजना सर्वसाधारण लोकांना पटावी म्हणून योजलेली दिसते असें श्री. प्रियोळकर म्हणतात. पण वापाचा अुद्धार केल्याशिवायहि लोकांना पटेल असें विवेचन करतां येणें शक्य आहे असें वाटतें. त्यांनी अुद्धृत केलेल्या ज्ञानेश्वरांच्या अभंगांत अंगाला भस्म फासणाऱ्या ढोंगी लोकांना अुकिरड्यावर लोळणाऱ्या गाढवाची अुपमा दिली आहे. हा अभंग ज्ञानेश्वरांचाच असेल असें खात्रीने सांगतां येत नसलें तरी अशा रीतीच्या कावळा, कुत्रा, अुंदीर, गाढव अित्यादि अुपमा ज्ञानेश्वरींतहि दुष्ट अभक्तांचीं किंवा आसुरी प्रकृतीच्या लोकांचीं वर्णनें करतांना आल्या आहेत. पण ज्ञानेश्वरींत सूकराची (डुकराची) अुपमा कोठेहि आली नाही. सूवर ही शिवी यवनांमध्ये प्रचलित आहे. मराठी योगवासिष्ठांत ही अनेक वेळां आली आहे. त्यावरून या ग्रंथाच्या काळाविषयी कांही अंदाज बांधतां येअील. योगवासिष्ठांत ग्रंथ समाप्तीला आला असतां पसायदान मागण्याच्या आधी या ग्रंथांतील शिकवण न आवडणाऱ्या लोकांना केलेली शिवीगाळ अुर्मटपणाची व अुद्वेगकारक आहेच पण निर्मूलहि आहे. मूळ योगवासिष्ठाच्या शेवटच्या दोन्ही सर्गांत असा प्रकार आढळत नाही. "पडो मेदिं भुणं आगळें। न बोलें संस्कृतावेगळें। आपुलिया मती बोलें। तरि श्रीगुरू लाजविला ॥१-९३॥ अेक अक्षर संस्कृतिचें जाओं नेदीं वायां। अैसें आर्थीन ॥८-१००॥ असें ठिकठिकाणीं ग्रंथकार म्हणत असला तरी तसा तो वागलेला दिसत नाही. बऱ्याच गोष्टी पदरच्या दडपून देअून "म्हणौनि या कारणें। हें वासिष्ठसंग्रहणें। संस्कृतादूनी लक्ष गुणें। अधिक हें ॥१०-१३३॥ असेंहि म्हणण्यास तो डरत नाही.

संस्कृत योगवासिष्ठाची आणि मराठी योगवासिष्ठाची कोणीं तुलना केली तर ग्रंथकार हा जसा ज्ञानेश्वरांचा तोतया आहे तसा त्याचा ग्रंथहि योगवासिष्ठाचा तोतया आहे असें आढळून येण्याचा पुष्कळच संभव आहे. मूळ योगवासिष्ठाच्या सहा प्रकरणांपैकी अेकाचेंहि नांव या ग्रंथाच्या दहा प्रकरणांना दिलेलें नाही. लघुयोगवासिष्ठसाराच्या दहा प्रकरणांपैकीहि कोणतेंच नांव या ग्रंथाच्या दहा प्रकरणांना नाही. हा ग्रंथ मोठ्या योगवासिष्ठावर आधारला आहे असें कै. चांदोरकर म्हणतात. मोठ्या योगवासिष्ठाचे अेकंदर ६७४ सर्ग आहेत. त्यांपैकी अेकाचेंहि नांव यांतील प्रकरणांना दिलेलें नाही. मुळांतील आधार फक्त अेकाच विषयाला दाखवितां येतो; आणि तो म्हणजे गृहस्थाश्रमनिषेधप्रकरणांतील स्त्रीनिंदेला! अशी स्थिति असल्यामुळे या ग्रंथाला 'स्वतंत्र रचना' हें नांव कै. चांदोरकरांना द्यावें लागलें. अुत्तमोत्तम विषयांच्या ६७४ सर्गांतून ग्रंथकाराला आधाराला घेण्यासारखा फक्त अेक सर्ग आठवला, आणि तो म्हणजे स्त्रीजुगुप्सेचा! चतुर्युगधर्मप्रकरणाला आधार म्हणून श्री. देशपांडे यांना कृष्णयाज्ञवल्कीच्या कथाकल्पतरूकडे बोट दाखवावें लागलें आहे. सत्शिष्यप्रशंसा व शिष्यदूषण या प्रकरणांना मुमुक्षु प्रकरणांतील १२ वा सर्ग आधारभूत असावा असें कै. चांदोरकरांनी म्हटलें आहे. पण त्या सर्गांत तसा आधार कांहीहि आढळत नाही. सिद्धसंगप्रशंसा, षड्दर्शनविवरण, अष्टांगयोगविवरण, सर्वांतरात्मप्रशंसा, प्राणसांकळी व परब्रह्मयोगसाधनकथनम् या प्रकरणांसंबंधीहि तोच प्रकार आहे. मुळांत त्यांना फारच थोडा आधार सांपडण्याचा संभव आहे.

पहिल्या सहा प्रकरणांत मंगलाचरण, गुरुस्तुति, श्रोत्यांची प्रार्थना व मराठी भाषेची स्तुति या अवांतर विषयांत ज्ञानेश्वरांची नक्कल करण्याचा प्रयत्न दिसतो. (१) सातव्या अष्टांगयोग प्रकरणांत समाधीच्या नंतर सिद्धासन हें आठवें अंग सांगितलें आहे. (२) कर्मयोग, हटयोग, लययोग व राजयोग हे योगाचे चार प्रकार केले आहेत, व (३) यमनियम हा कर्मयोग,

प्राणप्रत्याहार हा हटयोग, धारणाध्यान हा लययोग व समाधिसिद्धासन हा राजयोग अशी विभागणी केली आहे (७-१०,११,१४) या गोष्टी ज्ञानेश्वरींत नाहीत. यमनियमप्राणायामांच्या विवेचनांत योगशास्त्रांत आढळणाऱ्या स्पष्टीकरणापेक्षा कितीतरी अधिक गोष्टी घातल्या आहेत. उठिली चिरगति (७-४८), कर्मयोगी पवनु जारिजे (७-१२ व ४५), चंद्रसूर्यचक्रें चाळिती (७-६४) हे शब्दप्रयोगहि ज्ञानेश्वरींत आढळत नाहीत. सिद्धासन या आठव्या अंगाचें विवेचन केलेलें नाही. आठव्या प्रकरणांत सर्वांतरात्म्याचें वर्णन केल्यानंतर तो पवनाभ्यास-युक्तीनें प्राप्त होतो (८-३५) आणिक साधनें भ्रांतियुक्त आहेत (८-३६) असें सांगितलें आहे. आत्मप्राप्तीचें अेकच साधन सांगणें व बाकीचीं खोटीं ठरविणें ज्ञानेश्वरीशीं विसंगत आहे. नवव्या प्रकरणांतील प्राणसांकळी, सृष्टीच्या उत्पत्तीचा क्रम, दशपवनांच्या मिळणीचा विचार व पंचीकरण हे विषय ज्ञानेश्वरींत नाहीत. दहाव्या प्रकरणांतील योगप्रक्रिया ज्ञानेश्वरीच्या सहाव्या अध्यायांतील योगप्रक्रियेशीं आरंभीं जुळती असली तरी शेवटीं जुळती नाही. १०-३० ते ३४ ओव्यांतील शेवटचा क्रम ज्ञानेश्वरींत नाही. गृहस्थाश्रमनिषेधाच्या प्रकरणांत म्हणोनि नदी-तटींचिया वृक्षा। आणि घराश्रमींचेया पुरुषा। मोक्षाची नाहीं आशा। रघुराया॥ ९७॥ गृहस्थाश्रमी पुरुषाला मोक्षाची आशा नाही असें सांगून व त्याकरिता अप्रत्यक्षतया संन्यासाची आवश्यकता प्रतिपादून ज्ञानेश्वरीशीं व भागवतधर्माशीं विसंगत सिद्धान्त केला आहे.

हा ग्रंथ भागवतधर्माचा नाही हें मान्य करूनहि तो ज्ञानेश्वरांचाच असावा असें श्री. देशपांडे म्हणतात. कारण त्यांत विषमतेपेक्षा साम्याचेंच प्राबल्य जास्त आहे असें त्यांस वाटतें. वरील विवेचनांत साम्यापेक्षा वैषम्याचेंच प्राबल्य जास्त कसें आहे तें दाखविण्याचा यथामति प्रयत्न केला आहे. त्यावरून हा ग्रंथ ज्ञानेश्वरांचा नव्हे असें निश्चित विधान करण्यास मला प्रत्यवाय दिसत नाही. "ज्ञानेश्वरीमध्ये जो ज्ञानेश्वरांच्या काव्यकल्पनेचा किंवा शब्दचातुर्याचा विलास दिसतो तसा किंवा तितका योगवासिष्ठांत नाही" हें मान्य करूनहि हा ग्रंथ ज्ञानेश्वरांचा ठरविण्याकरिता श्री. प्रियोळकरांनी केलेला युक्तिवाद पटण्यासारखा नाही हें वर दाखविलें आहे. "ज्ञानेश्वरादिकांचें संतवाङ्मय, महानुभाववाङ्मय, व स्टीफन्स प्रभृति पाद्रींचें खिस्ती वाङ्मय या तीनहि प्रवाहांचा त्रिवेणीसंगम प्रस्तुत योगवासिष्ठांत झाला आहे" असा जो निष्कर्ष श्री. प्रियोळकर यांनी त्यांच्या विवेचनाचा काढला आहे त्यावरूनहि 'हा ग्रंथ ज्ञानेश्वरांचा नव्हे' हें सिद्ध होतें व या तिन्ही प्रवाहांशीं परिचित असणाऱ्या कोणींतरी गृहस्थानें ज्ञानेश्वरांनंतर त्यांच्या नांवावर ग्रंथ लिहिला हें स्पष्ट होतें.

हा ग्रंथ ज्ञानेश्वरांचा नव्हे हें जसें निश्चित सांगतां येतें तसें हा ग्रंथ कोणीं व केव्हा लिहिला हें निश्चित सांगण्याइतका पुरावा नाही. या दृष्टीनें हा ग्रंथ 'प्रगूढ' आहे हें मान्य केलें पाहिजे. हा ग्रंथ महानुभावपंथाचा नाही हें श्री. देशपांडे यांचें म्हणणेंहि बरोबर आहे. कारण या ग्रंथांत ओश्वराच्या सगुणस्वरूपाचा, भक्तीचा व द्वैताचा पुरस्कार नसून अद्वैताचा आभास निर्माण केला आहे. पण या ग्रंथाचा लेखक महानुभावपंथीय किंवा त्या पंथाच्या तत्त्व-ज्ञानाशीं परिचित असावा असें मात्र स्पष्ट दिसतें. श्रीचक्रधरांचीं अनेक सूत्रें या ग्रंथांत उद्धृत केल्याचें प्रसिद्ध महानुभावसंशोधक श्री. ह. ना. नेने यांचें म्हणणें आहे. त्याशिवाय युगधर्म, अंतराळ, अष्टदेवयोनि इत्यादि महानुभावपंथांतील गोष्टी या ग्रंथांत आल्या आहेत. संन्यासाचा पुरस्कारहि त्या पंथाच्या तत्त्वज्ञानाशीं सुसंगत आहे. भक्तीबरोबर द्वैत आणि संन्यास प्रतिपादन करणाऱ्या श्रीचक्रधरांच्या सूत्रांची उसनवारी श्रीज्ञानेश्वर करतील हें संभवत नाही. म्हणून हा ग्रंथ महानुभावपंथाशीं परिचित असलेल्या गृहस्थानें लिहिला असण्याचा संभव आहे.

या प्रश्नाला चालना दिल्याबद्दल श्री. प्रियोळकर यांनी माझे आभार मानिले आहेत. ते खरोखर श्री. देशपांडे यांचे मानले पाहिजेत. तोतयाचें नक्षीत ठरलेलें असलें तरी श्री. देशपांडे व श्री. प्रियोळकर यांच्यासारख्या संशोधक विद्वानांनीं खुद्द संपादक व प्रकाशक यांची ग्रंथकार तोतया असल्याची खात्री झाल्यानंतरहि त्याला हाताशीं धरलें आहे, त्या अर्थी हें 'तोतयाचें बंड' बरेंच गाजणार असें दिसतें. "ज्ञानेश्वरांचें तत्त्वज्ञान" या ग्रंथांत विस्तारभयास्तव जी चर्चा करितां आली नाही ती करावयाची संधि दिल्याबद्दल श्री. प्रियोळकर यांचा मी आभारी आहें.

—— ——

# मराठी पद्यरचनेंत आणखी सुधारणा

[ लेखक–श्री. श्रीराम अत्तरदे ]

**प्रास्ताविक**—प्रचलित शब्दरूपांहून काव्यगत मराठींतील शब्दांचीं रूपें वेगळीं, म्हणजे जुन्या रूपांना जवळ, असतात असें आढळून येईल. देखून, आठवून, बोलून, घेऊन हीं रूपें वापरायचीं कुणीं तर गद्यलेखकांनी; कवींनी नव्हे. कवींनी देखूनी, आठवूनी, बोलूनी, घेऊनी असें म्हणावें; नी याच्याहि पुढली पायरी म्हणजे वाच अेकेका शब्दाचीं अनेक रूपें बनवायचीं. तशांतच कवीला 'खून' माफ असल्यामुळे ऱ्हस्वाचें दीर्घ नी दीर्घाचें ऱ्हस्व करायची नेहमी प्रवृत्ति पाहा: घेअून हा अेकच शब्द— घेअून, घेअुन, घेअूनी, घेअूनि, घेअुनि, घेवोन, घेवोनि, घेवोनी— इतक्या रूपांत अुपयोजिला जातो! अितक्यावरच यादी संपली असें नाही. घेअूनीया, घेअुनीया, घेअुनीया, घेअुनिया, घेवोनिया, घेवोनीया, यांचीहि त्यांत भर. रूपांची कोण ही भाअूगर्दी! आणि या पंधरा रूपांतील प्रचलित रूप काय तें अेकच:— घेअून.

काव्याच्या सौन्दर्यासाठी हीं रूपें अुपयोजिलीं जातात असें कुणी प्रांजलपणें म्हणूं शकेल काय? भाषेचे भूतकालीन अवशेष काव्यकृतींत आणायची सवलत कितपत घ्यायला कवींना मुभा असावी? सौन्दर्यासाठी वा वैदग्ध्यासाठी जुने शब्द — तेहि क्वचित् — वापरले तर कुणी मना करणार नाही, पण जुनीं रूपें मात्र अपवादादाखल आलेलींच क्षम्य म्हणतां येतील. प्रचलित भाषेवर जुन्या रूपांचा म्हणजे व्याकरणाचा वरचष्मा होणें अिष्ट नाही; सौन्दर्यवर्धक तर खास नाही. पुष्कळ वेळां वृत्तविषयक कांटेकोरपणा सांभाळण्यासाठी प्रचलित रूपांत बदल करुन वेगळेंच चमत्कारिक (जुनेंहि नव्हे) रूप योजण्यांत आल्याचीं अुदाहरणें आढळतात, अुदा० 'घेत्रोत'ऐवजी 'घेअुत'. कै. माधवराव पटवर्धन आपल्या 'छंदोरचने'त म्हणतात: "......गद्य लेखकांपेक्षा कवीला थोडें अधिक स्वातंत्र्य देण्यांत येतें. हें वनिराळ्या शब्दांनीं सांगायचें म्हणजे **काव्याची गद्यभाषासरणीपासून च्युति ही कांही प्रमाणांतच क्षम्य असते**. तेव्हा कवीने किती स्वातंत्र्य चालवावें याचा विचार तडजोडीने आणि नेमस्तपणाने व्हायला पाहिजे, कवि आणि वाचक यांनी अेकमेकांची सोय पाहायला हवी,

आणि.........ज्या काळांत कवि रचना करतो त्या काळच्या लोकांना तो आपलीच प्रचलित भाषा लिहीत आहे हें पटलें पाहिजे.'' (-पृष्ठें ८१-८२). भाषेचें मुख्य अंग व्याकरण हें असून शब्द हें त्याच्याहून थोडें गौण अंग आहे. व्याकरणी रूपांहून भाषेची निश्चिति प्रायः केली जाते. शब्दांना कमी महत्त्व आहे असें नाही, परंतु पहिल्यास अधिक आहे. तेव्हा, कवि आपल्याच प्रचलित भाषेंत रचना करीत आहे असें लोकांना केव्हा वाटेल? त्याची भाषा व्याकरणदृष्ट्या अद्यावत् असेल तेव्हाच. जुन्या रूपांचीं काव्यगत अुदाहरणें देत बसून अिथे विस्तार मांडायची अिच्छा नाही; मूळ मुद्दा निर्देशिला म्हणजे झालें.

आणखी अेक विचार पुढे येण्याचा संभव आहे. तो म्हणजे वृत्तविषयक सोयीसाठी जुनीं रूपें वापरलीं जात असल्याच्या संभाव्यतेचा. तथापि यांत कांही फारसें तथ्य नाही असें दिसून येअील. 'करून'अैवजी 'करूनी' या नि अशाच संबंधी अीकारादिकांची आवश्यकता नसूनहि केवळ कवि लोकांत अेक प्रकारचा माव्हरा पडून गेला आहे म्हणूनच प्रचलित रूपें जुन्यांसारखीं विकृत करण्यांत येत असतात. आणि वृत्तासाठी जर खरोखरच अेवढ्या विकृति करणें भाग पडत असेल तर सांस्कृत वृत्तें अितकीं काय लाडवून ठेवायचीं की त्यांच्या विशिष्ट चाकोरींतून जाण्यासाठी बिचाऱ्या भाषेचे अितके हाल करावे? त्यापेक्षा अेका नामशेष झालेल्या भाषेंतील वृत्तांचा तोच-तोपणा टाकून देअून स्वाभाविक छंदः-प्रकार अवलंबणें अधिक श्रेयस्कर. अिथे अेका शोचनीय स्थितीचा निर्देश केल्यावाचून राहवत नाही. आधुनिक म्हणवणाऱ्या नी 'मुक्तच्छंदा'चा पुरस्कार करणाऱ्या कांही कवींच्या कवनांतून देखील जुनीं ठराविक ठशाचीं रूपें आढळांत येत असतात. काव्याचें वाहन बदललें, पण भाषारूपी वेष मात्र जितका अद्ययावत् असायला पाहिजे तितका तो दिसून येत नाही. वाक्यांतील शब्दांचे क्रम बदलणें, सौन्दर्याचा वा वैदग्ध्याचा द्योतक म्हणून प्रशस्त जुना वा नवनिर्मित शब्दसंभार अुपयोजणें, शिवाय कलानुषंगी अलंकारादींची कमजास्त योजना या गोष्टी गद्याहून पद्याचें वेगळें ठळक स्वरूप अुघड करायला पुरेशा आहेत; अितर गोष्टींचें निरर्थक वर्चस्व आदरण्याची वेळ नी कारणें हीं आता राहिलेलीं नाहीत. थोडक्यांत पुढील मुद्दे मला अभिप्रेत म्हणून सांगायचे आहेत:

—प्रचलित मराठी गद्यांत जीं धा. सा. अव्ययें निभृत अकारान्त आहेत तीं विकृत करूं नयेत. क्रियापदेंहि जुन्या धर्तीवर विकृत करूं नयेत.

—करीं, करिशी, करी, करिती, हीं नि याच धर्तीचीं अितर रूपें प्रचारांत नसल्यामुळे त्याज्य गणावींत. या रूपांनी कवितेंत अनेक काळ दर्शविले जात असले तरी प्रचलित भाषेंत आख्यातनिर्देश करणें कठीण नाही. करी, जाअी, घेअी अित्यादि रीतिभूतकाळी रूपें प्रचलित असल्यामुळे तोच काळ निर्देशिण्यासाठी त्यांचा अुपयोग व्हावा.

—आज्ञार्थी करीं, घेअीं, बोलें, सांगें अित्यादि रूपें सुतराम् त्याज्य समजावींत. करीत, म्हणशील, देतील अशा निभृत-अकारान्त रूपांतील अुपान्त्य स्वर कधीहि ऱ्हस्व करूं नये. तद्वतच अन्त्याक्षर दीर्घ असतां अुपान्त्य स्वर ऱ्हस्व असतो तो दीर्घ करून करीतो, पहीलें, करीतां, अशीं रूपें करूं नयेत. याच्याहि पुढे जाअून प्रचलित मराठींत 'करितो' अैवजी 'करतो', 'वेचितां'अैवजी 'वेचतां' अशीं रूपें वापरावींत.

—नेअी, येअी, होअी अशा रूपांच्या ठिकाणीं ने, ये, हो अशीं रूपें वापरणें योग्य नव्हे.

अनुक्रमणिका

—सामान्य रूपांतील अुपान्त्य स्वराचें ऱ्हस्वीकरण करूं नये. तें (द्वितीया); अें, ओं, आं, हीं (तृतीया); आं, ओं (सप्तमी); हे प्रत्यय अुपयोजूं नयेत. मात्र प्रचलित भाषेंत जिथे म्हणून त्यांचे अवशेष राहिले आहेत तिथे ते वापरावेत— मीं, जागीं, वेळीं, अि.

साराश, ऱ्हस्वाचें दीर्घ नि दीर्घाचें ऱ्हस्व करणें, शब्दरूपें विकृत करणें, प्रचलित नसलेलीं व्याकरणी रूपें अुपयोजणें, ह्या सर्व गोष्टी टाळणें अत्यावश्यक आहे.

मराठी पद्यरचनेसंबंधी जी सुधारणा मला सुचवायची आहे तिचा हा अुपोद्घात झाला. वर सांगितलेली 'अद्ययावत् भाषासरणी' या नवीन पद्यरचनेसाठीच अवलंबायची. पद्यरचनेंतील ही सुधारणा कोणती ?

आधुनिकांतील श्री. पु. शि. रेगे यांच्या 'स्वागत' या कवितेंतील हा अुतारा पाहा—

तव स्वागता जें जें मीं विरचिलें,
हृदयसंभ्रमें व्यर्थ असें जाहलें.
इंवस्नात हीं टप्पोरीं बघ फुलें,
गडे, मोतियांचीं फुलें,
आणाया मीं विश्व ग धुंडाळिलें,
तुजसाठी धुंडाळिलें—
परि तव । मुखकमलाशीं चुंबनबंधीं
स्पर्धा करतिल प्रणयच्छंदीं,
सखये, म्हणुनी चुरडुनि त्यां टाकिलें.........

आता याच कडव्याचा वाक्यान्वय लावून प्रचलित पटवर्धनी पद्धतीप्रमाणे प्रत्येक 'अक्षरा'चें मात्रालेखन करतों. ˘ ऱ्हस्व, । दीर्घ.

तव स्वागता जें जें मीं विरचिलें, (तें) हृदयसंभ्रमें असें व्यर्थ जाहलें. गडे, हीं टप्पोरीं इंवस्नात फुलें— मोतियांचीं फुलें—आणाया मीं विश्व धुंडाळिलें ग ! (तुजसाठी धुंडाळिलें) अित्यादि.

अन्वय साधूनहि ही भाषा गद्यांत वा भाषणांत अुपयोगीं पडणार नाही. म्हणजे प्रचलित भाषासरणीहून ती बरीच भिन्न आहे. तिच्यांत प्रचलित शब्दांचीं जुनीं रूपें आहेतच, शिवाय मुख्य मुद्दा हा कीं गद्यांत म्हणजे ग्रंथकारमान्य गद्यांत शब्दांचे जसे अुच्चार होतात तसे ते अिथे (पद्यांत) करतां येत नाहीत. निभृत अ ज्यांच्यांत आहे अशा 'अक्षरां'नाहि पूर्णोच्चाराचा वाव द्यावा लागत आहे नि मागील अक्षराबरोबर जें ओझरतें अुच्चारलें जातें असें 'अक्षर'हि पूर्ण उच्चारलें जातें. आता पुढील अुतारा पाहा :

आवडत्याहि व्यक्ती जातात, स्मृती परंतू त्यांच्या
होअून राहतात खऱ्या चिरन्तन. चैतन्य जगांत जें जें
जायचंच तें. का येअील ठेवतां धरून कधी ?
देहाची तर होते रक्षा. आणी नशिबीं येतं
सहवासाच्या स्मृती अुरागीं कवटाळायचं.

(–'माअी', स्वकृत)

या रचनेंत दिसून येअील कीं वरीलप्रमाणे स्थिति नाही. प्रचलित गद्यसरणीप्रमाणे सर्व शब्दरूपें असून शिवाय शब्दांचे अुच्चारहि प्रचलितांप्रमाणेच आहेत. पाहा :

आवडत्याही व्यक्ती जातात, स्मृती परंतू त्यांच्या
होऊन राहतात खऱ्या चिरन्तन...अित्यादि.

(आणि रचना पटवर्धनी पद्मावर्तनांत बसते).

आता मात्र ध्यानांत आलें असेल की मला जी सुधारणा अभिप्रेत आहे ती म्हणजे प्रचलित ग्रंथकारमान्य गद्यांतल्याप्रमाणे सरणी नि शब्दोच्चार अवलंबून केलेली पद्यरचना हीच होय. 'राजा शिवाजी'कर्ते कै. कुंटे यांना मराठीच्या लेखनपद्धतींतील सदोषता तीव्रतेने जाणवली. गद्य अुच्चारांना अनुसरून असावयाच्या पद्यरचनेची जाणीव त्यांना तितकीशी झालेली नसावी. कुंटे म्हणतात, "हा शुद्ध मराठी शब्दांचा दोष नाही; पण अक्षरविभागणीची आणि अक्षरमोजणीची पद्धत ही अनियमित आणि अस्वाभाविक आहे. मराठी शब्द जसे अुच्चारले जातात तसें ते लिहिण्यांत येत नाहीत. अुदाहरणार्थ, 'अुचलून' या शब्दाचा अुच्चार करतांना पूर्ण चार अक्षरें कोणीहि अुच्चारीत नाही 'च' हें केवळ व्यंजन असून तें तत्पूर्वील 'अु'मध्ये समाविष्ट होतें आणि त्यामुळे तें अक्षर गुरु होतें. लेखी मराठी आणि बोललेली मराठी यांच्यांतील हा भेद जोपर्यंत दूर करण्यांत येत नाही, निदान ओळखला जात नाही, या भेदाच्या जाणिवेवर जोपर्यंत अेखादी नवी पद्धति स्थापण्यांत येत नाही, तोपर्यंत मराठी पद्यरचनेच्या कार्याची ही हानिच होत राहणार." (भाषान्तर, कै. पटवर्धन).

याच विषयासंबंधाने कै. पटवर्धन म्हणतात: "दैनिक बोलींत शब्दान्त्य अ चा अुच्चार क्वचितच होतो; आणि जर, मग, कळ अित्यादि द्व्यक्षरी शब्दांतील अन्त्य अकार गाळून अुपान्त्य अ हटकून दीर्घ होतो. तरी पद्यांत हा शब्दान्त्य अकार अुच्चारावा आणि अुपान्त्य अकार ऱ्हस्वच गणावा अशी वहिवाट आहे. जर, मग, कळ अित्यादि शब्दांचें लगत्वलेखन ७५ असेंच होतें. बोलतों, चालतो अित्यादि शब्दांतहि मधला अकार गळून सामान्य अुच्चार बोल्तो, चाल्तो असा होतो; तथापि या अुच्चाराला अद्यापि मान्यता मिळालेली नाही. अेरव्हींचा अुच्चार आणि काव्यपठणांतील अुच्चार यांतील हा भेद स्वाभाविकपणाला थोडा मारक होतो हें खरें आहे. हा भेद काढून टाकल्यास भाषेचें स्वरूप किती निराळें दिसेल या कल्पनेनेच डोळे मिटून घ्यावेसे वाटतात. तथापि ही क्रांति बहुजनांच्या योजनेने आणि दंडकाने घडवून आणल्यास तें अनिष्ट होअील असें मात्र नाही. (छंदोरचना, पृ. ७८-७९.)

शास्त्र वा कला हीं सर्वांच्या पुरस्काराने वृद्धिंगत होतात. आपापल्या शक्यतेनुसार प्रत्येक शास्त्रज्ञ जात असतो. पटवर्धनांना प्रचलित गद्य नी पद्य यांतील भाषाविषयक वैषम्य दिसत होतें. तेवढा निर्देश त्यांनी केला. आता शब्दांचे अुच्चार नि लेखनपद्धति यांतील वान्धा निभावून गेल्यास पुढील पद्यरचनाविषयक सुधारणा शक्य होअील. वास्तव अुच्चाराप्रमाणे लेखन करतांना हलचिन्हादिकांची गर्दी वाढवण्यापेक्षा प्रचलित गद्य जसें लिहिलें जातें तसेंच लेखन करून शब्दांचे अुच्चारहि गद्यांतल्याप्रमाणेच प्रमाण मानायचा निर्णय घेतल्यावर मीं रचनाविषयक प्रयोग आरंभिले. आता, कै. कुंट्यांनी म्हटल्याप्रमाणे 'या भेदाच्या जाणिवेवर 'अेखादी नवी पद्धति स्थापण्या'ची गोष्ट फार दूरची आहे. तथापि गद्याप्रमाणेच लेखन करण्यापूर्वी प्रचलित गद्याच्या लेखनांत कोणत्या सुधारणा आवश्यक आहेत त्याचाहि विचार करणें अगत्याचें होअील.

संस्कृत भाषेची ध्वनिशास्त्रास अनुसरून असलेली लेखनपद्धति सर्व भाषाशास्त्रज्ञांच्या प्रशंसेस पात्र झालेली आहे. परंतु संस्कृताची ही लेखनपद्धति संस्कृतोद्भव वा स्वतां संस्कृत ज्या वर्गात मोडतें त्या हिन्दु-आर्य वर्गातील भाषांना लावतांना तिच्यांत अुच्चारानुसार फेरफार

करणें अवश्य होतें. प्रस्तुत लेखाच्या पूर्वभागांत सांगितल्याप्रमाणे मराठीची लेखनपद्धति मराठी अुच्चारांस धरून नाही. यांत वर सांगितलेल्या अुणीवांखेरीज आणखी दुसऱ्या कांही अुणीवा आहेत. संस्कृतांत जे विवृत शब्द ऱ्हस्वान्त आहेत त्यांचा मराटींत दीर्घान्त अुच्चार होत असतो, अुदा० मति, शक्ति, संधि, गुरु, मनु हे शब्द शुद्ध संस्कृत होत. मराठींत ते मती, शक्ती, संधी, गुरू, मनू असे आले आहेत नी त्यांचे असेंच लेखन करणें सयुक्तिक होअील. तडजोड करायची म्हटलें तर हे शब्द दीर्घान्त लिहिण्याचें दुसरें अेक समर्थन आहे. संस्कृतांत हीं ऱ्हस्वान्त प्रतिपादिकें आहेत; वाक्यांत अुपयोग होतांना त्यांचीं प्रथमेचींहि रूपें होतात, आणि तीं विसर्गयुक्त असल्यामुळे दीर्घत्व ओघानेच येतें. अर्थात् तत्सम शब्द म्हणून मराठींत वाटल्यास हीं ऱ्हस्वान्त प्रतिपादिकें मानावींत म्हणजे त्यांचीं प्रथमेचीं रूपें दीर्घान्त मानावीं लागतील, कारण प्रत्यक्ष स्थिति अशीच आहे. हा प्रश्न तरी अगदींच नवीन नाही. थोरले शास्त्रीबुवा याच मताचे होते. रा. भि. जोशी यांच्या 'मराठी भाषेची घटना' या ग्रंथांत म्हणजे पुष्कळ वर्षांपूर्वीं ह्या पद्धतीचा अवलंब झालेला असून बरीचशी आधुनिक मंडळी ह्या बाजूस सामील होतील तर भाषेचें लेखन सुतराम् यथास्थित होअील. संस्कृत ऱ्हस्वान्त विवृत शब्दांचें मराठींत असें दीर्घान्त विवृत लेखन करण्याविषयीच्या माझ्या या प्रतिपादनास विद्वान् वैयाकरण श्री. गो. कृ. मोडक यांच्या संमतीचीहि जोड आहे. (श्री. मोडक, महाराष्ट्र-साहित्य-पत्रिका, अंक ६२, पृ० १८८८–८९).

या ऱ्हस्वान्त विवृत शब्दांखेरीज तत्सम धातुसाधित विशेषणें, क्षणिक, दैविक यांसारखे अिक-प्रत्ययी ऱ्हस्वोपान्त्य शब्द त्यांच्याहि दीर्घोपान्त्य लेखनाचें समर्थन केलें पाहिजे. ही सुधा-रणा सुद्धा अंमलांत आली तर चांगलें, परंतु अशा शब्दांच्या ऱ्हस्वोपान्त्य स्थितींतहि पद्यांत मात्रागणनेला बाध येत नसल्यामुळे तूर्त प्रचलित गद्यांतल्याप्रमाणे सूचित, योजित, क्षणिक, वैयक्तिक असेंच लेखन पद्यांत टेवायला प्रत्यवाय नाही. मात्र अशा शब्दांत शेवटच्या 'अक्षरां'-तील अकार निभृत अतअेव मागील अक्षरांत तें अक्षर समाविष्ट होअून तें (मागील अक्षर) गुरु समजलें जाअील, अुदा० 'वैयक्तिक' हा शब्द पटवर्धनी पद्धतीप्रमाणे चार अक्षरी न गणतां तीन अक्षरी गणावा लागेल आणि त्याचें मात्रालेखन – – ⏑ ⏑ असें न होतां । । । असें होअील ( । दीर्घ, ⏑ ऱ्हस्व). यावरून दिसून येअील की संस्कृतांतील ऱ्हस्वान्त विवृत शब्दां-च्या मराठींत दीर्घान्त लेखनाखेरीज प्रचलित गद्याचीच लेखनपद्धति पद्यासाठी स्वीकारण्याचा माझा आग्रह आहे.

झाली ही अेवढी पार्श्वभूमि झाली. आता प्रचलित गद्याप्रमाणे अुच्चारानुसार करावया-च्या पद्यरचनेचें दिग्दर्शन करून आटोपतें घेतों. संस्कृत नी आता फारशी मिळून अेकंदर वृत्तविस्ताराला 'पटवर्धनी वृत्तें' ही संज्ञा तात्पुरती घेअून चालूं. सकृद्दर्शनींच असें दिसून येअील की वृत्तांहून जातिरचना अधिक सुकर आहे, कारण पूर्वोक्तांमधील लगत्वाचें कडक बंधन अुत्तरोक्तांत मात्रिक बंधनांत म्हणजे अेक प्रकारच्या सौन्दर्यवर्धक नी प्रवाही शैथिल्यांत पर्यवसान पावतें. अक्षरछंदांत म्हणजे 'पटवर्धनी छंदां'त रचना कितपत सुकर वा दुष्कर असते हा प्रश्न विवाद्य असूं शकेल; परंतु 'वृत्तें' नी 'जाति' यांच्यामधील वरील भेद कुणीहि आधुनिक मान्य करील. आता, गद्योच्चारी रचनेसाठी, जोंपर्यंन्त कै. कुंट्यांच्या म्हणण्याप्रमाणे 'अेखादी नवी पद्धत स्थापण्या'ची क्लृप्ति सध्या तरी दृष्टीच्या टप्प्यांत नाही तोपर्यंन्त, प्रचलित रचनेप्रमाणेच 'वृत्तां'हून 'जाति' अधिक सुकर वाटणार नी अनुभवास येणार हें साहजिकच

आहे. 'वृत्तां'त रचना तितकीच दुष्कर नी कमी प्रवाही होणार असा कयास बांधतां येअील. पुढील गद्योच्चारी रचना अग्न्यावर्तनी समवृत्तांत आहे. पाहा :

(१) 'प्रेम हवं का हो ?' विचारतेस अन् तितंत्रा मात्र करतेस.
आमिषं दावून कशाला पाठिमागून हात अुगारतेस ?
'कडकडून भेटूं हो' म्हणतेस, वाघनखं हातीं लपवतेस.
सर्व गप्पा मात्र कोरड्या, शर्करेंत अन् शब्द घोळतेस.

अशाच (अर्थात् गद्योच्चारी) अग्न्यावर्तनी रचनेसाठी विषम पण लगत्वभेद पाळणाऱ्या पद्यांतील पुढील अुतारा पाहा :

(२) गे तुझी माझी अदावत कुल जगाला ठाअुकी.
दिलजमाअी आज खुषीनं तूंच निघालीस ना करायला ?
जें कधीपासून मनांतल्या गे मनांतच राहिलं.
तें अुतरलं पूर्ण प्रत्यक्षामधी.
धन्य केलंस आज मला.

ठोकळ मानाने तालबद्धता, वा पारिभाषिक काटेकोरपणा सांभाळून बोलायचें म्हटल्यास लयबद्धता हाच छंदाचा (पद्यशास्त्राचा) मूलभूत पाया म्हणून विशिष्ट लगत्वाच्या आवर्तनाचें प्रमाण घेअून वरच्यासारखी विषम (जिला अलीकडे 'मुक्त' म्हणण्यांत येतें अशी) रचना करणें मात्र नावीन्याचें आकर्षण होअूं शकेल. 'वृत्त' विस्ताराच्या वृक्षाला नवीन विकासांची ही शाखा जोडण्याची नव्या कवींनी (मग ते रचना गद्योच्चारी करोत वा प्रचलित पद्धतीने करोत) आस्था बाळगल्यास छान होअील. आणि अेवढा नवा भाग गद्योच्चारी रचनेस बराच सुकर होअील. पण प्रचलित पद्धतींतच पद्यरचना करणाऱ्या कवींनी चरणांची लांबी, विशिष्ट भागांत विशिष्ट अर्थ कोंबणें, यमकें अित्यादि निरर्थक बंधनें झुगारून दिल्यावर गद्योच्चारी रचनाकारांनी तीं आदरण्याचें कारण नाही; आदरून काव्याला कांही अुपयोग नाही. अेकूण 'वृत्तां'चा कोणता भाग गद्योच्चारी रचनेस अुपयुक्त आहे तें पाहिलें. वरील दोन अुदाहरणें पुरीं होतील असें वाटतें. यानंतर मात्राछंदाचा ('जाती'चा) परामर्श घेअूं. ही रचना पुष्कळच सुकरः घ्या :

(३) वर्षासंदेशका ! मनाच्या माझ्या संजीवका !
चैतन्यनिर्झरा !
लवणाकाठच्या अुंच अंजनावरून
वर्षेचं गान अशा निवान्तीं वायूवर सोडून
मारतोस अियलं सगळं वातावरण. कुठून ही
तुला मिळाली कला, सुंदरा !

रचना पद्मावर्तनी विषम आहे. छंदोलेखन असें होअील—(। दीर्घ, ᵕ ऱ्हस्व)—

| वर् पा सन् दे- | श का म ना च्या | मा झ्या सन् जी- | व का
| चै- तन् न्य निर् झ रा |
| लव णा काठ च्या | अुन् च अन् ज ना | व रू न् ...... अित्यादि.

अधिक स्पष्ट मात्रागणनेसाठी अनुस्वारादि अक्षरांचे भाग व्यंजनासारखे तोडून दाखवले

आहेत. याप्रमाणेच वरील नि यापुढील अुताऱ्यांचें छंदोलेखन होअील. मात्राछंदांतील आणखी अुदाहरणें:—

(४) आवडणाऱ्याही व्यक्ती जातात, स्मृती परंतु त्यांच्या
होअून राहतात खऱ्या चिरंतन. चैतन्य जगांत येतं जें
जायचंच तें. का येअील ठेवतां धरून कधी ?
देहाची तर होते रक्षा. आणी मशिदीं येतं
सहवासाच्या स्मृती अुराशीं कवटाळायचं.

(५) कृषिभूमीच्या संजीवक शक्ते !
पहा टपोरीं बोंडं कापसाचीं
हास्य निरागस दावतात पानांखालून
तुझ्या सगायन आगमनानं पावून हर्ष जणूं.
लडिवाळाची धरून हनुवटी प्रेमानं
कुणी हसवते माता, तशीच
हलकेंच ओढून घेतेस बोंडं मधू मधू.

(६) हास्य कपोलांत दावलंस कां ?
टकमक पाहून घेतलंस कां ?
मागून मुरका मारलास कां ?
मलाच कशी चोरी ?—
भुगराळ-भुगराळ लागलं व्हायला बघ माझ्या अंतरीं.

(—'हासलीस कां ?', स्वकृत).

प्रवाही मात्राछंदाचा ('जाती'चा) नमुना म्हणून स्वकृत 'अिन्दु-प्रकाश' या काव्यांतील खालील अुतारा देतों:—

(७) ग्रंथालय धुंडून
श्रान्त घरापाशीं.
आथुंदलों तेव्हा
"आं आओ ! काय हें ?
महान् श्रेष्ठ विदुषी
बसून गवाराच्या
—आहे—आहे आं—
कांही वैदग्ध्य !"

आलों कांहीसा
आणी वा ! अेकदम
मधे तुला देखून :
कुठून अरे वा आज
अिथं तुझ्यासंगें
शिंगा निसतात हो !
यांत देखील आहे

अक्षरछंदांत गद्योच्चारी रचना याहूनहि अधिक सुकर होअील असा माझा अंदाज आहे. स्वता मीं या बाबतींत प्रयोग फारसे केलेले नसून सध्या नुकतेंच लिहायला घेतलेलें 'चितेच्या प्रकाशांत' हें काव्य मात्र गद्योच्चारी अक्षरछंदांत लिहीत आहें. पटवर्धनी 'छंदां'त ऱ्हस्व वा दीर्घ अशीं दोन्ही प्रकारचीं अक्षरें दीर्घ अुच्चाराचीं असतात असें आजवर प्रतिपादण्यांत आलें आहे. वास्तविक पाहतां ओवी-अभंगादि अक्षरछंदी रचना गळ्यावर वा चालीवर म्हणतांना ऱ्हस्वाचें दीर्घ नी दीर्घाचें ऱ्हस्व अनियमितपणें करावें लागतें. ही चालीवर म्हणण्याची गोष्ट झाली, परंतु गेय रचनेकडून वाच्य रचनेकडे स्थित्यंतर होअू लागल्यावर

वरील प्रतिपादित नियमाचा फोलपणा प्रत्ययास आला. खरें पाहूं जातां केवळ छंदोलेखनाच्या सोयीसाठी अक्षरछंदांतील सारीं अक्षरें दीर्घ म्हणण्यापेक्षा सममात्रक गणण्यांत आलीं असावींत. आणि मात्रांचा प्रश्न अक्षरछंदांत अप्रस्तुतच म्हणायला पाहिजे, कारण त्याचें अक्षर हेंच प्रमाण आहे. साधारणपणें अक्षरांच्या ठराविक संख्येच्या आवर्तनाचे खटके घेतले जाणें हेंच त्यांतलें मर्म म्हणायला प्रत्यवाय नाही. 'भग्नमूर्ती'च्या पद्यांतील प्रत्येक अक्षर द्विमात्रक अुच्चारावें असें जेव्हा श्री. आत्माराम रावजी म्हणतात, तेव्हा तें पद्य वाचणें अगदी जिवावर येतें. न्हस्वदीर्घ जसें लिहिलें आहे तसेंच वाचून त्यांतल्या रचनेप्रमाणे पांच वा सहा अक्षरांनंतर खटके घेतले म्हणजे (ते साहजिकपणेंच घेतले जातात) त्या वाचनांत कांही प्रमाद घडतो असें नाही, अुलट तेंच अधिक साहजिक वाचन होय. गद्योच्चारी अक्षरछंदांत हीच पद्धत अनुसरणें आवश्यक आहे.

आता गद्योच्चारी अक्षरछंदांतील पुढील अुताऱ्यांचें छंदोलेखन पाहा. छंदोलेखनासाठी अुतारे मुद्दाम लहान घेतले आहेत.

(८) समाजघटना ! समाजघटना !— प्रश्न आहे अतां नाजूक.
पण केव्हाहि लागतात करावे महाप्रलय त्याच्यासाठीं.

[| १ २ ३ ४ | १ २ ३ ४ | १ २ ३ ४ | १ २ ३ ४
[| स माज घट ना | स माज घट ना | प्र श्न आ हे | अ तां ना जूक

| १ २ ३ ४ | १ २ ३ ४ ५ | १ २ ३ ४ | १ २ ३ ४ |
| पण के व्हा ही | लाग तात क रा वे | म हा प्र ळय | त्या च्या सा ठीं |

अेकूण आहे काय ? प्रस्तुत ओळी चार अक्षरी आवर्तनाच्या सम अक्षरछंदांत आहेत. दुसऱ्या ओळींतील दुसऱ्या आवर्तनांत मात्र अेक अक्षर Modulation म्हणून अधिक आलेलें आहे.]

(९) असा येअील अेक दिवस, जेव्हा तुझा.
निःपात आहे ठरलेलाच.

[| १ २ ३ ४ | १ २ ३ | १ २ ३ ४ |
[| असा ये अील | अेक दि वस | जे व्हा तु झा |

| १ २ ३ ४ | १ २ ३
| निः पात आ हे | ठर ले लाच.

पहिल्या ओळींतील दुसऱ्या आवर्तनांत वाक्यखंडाच्या अंतींचें निराम म्हणून अेक अक्षर (विकल्पें करून) कमी आहे. विषम अक्षरछंदांतील या दोन ओळी आहेत.]

वाटतें, झालें हें दिग्दर्शन सध्या पुरेसें आहे.

# चित्रपट आणि सार्वजनिक सदभिरुचि*

[लेखक– श्री. के. नारायण काळे]

......काव्य, कादंबरी किंवा लघुकथा यांच्याप्रमाणे नाटक आणि चित्रपट यांचा रसास्वाद अेकट्या माणसाला आपल्या खोलींत बसून स्वतःशींच घेतां येत नाही. या दोहोंपैकी नाट्यकला ही व्यक्तिनिष्ठ कलांच्या भरभराटीच्या कालांत अस्तित्वांत आली. तरी पण तिचें स्वरूप अितर कलांपेक्षा वेगळें आहे हें, 'नाट्यं भिन्नरुचेर्जनस्य बहुधाप्येकं समाराधनम्' या कालिदासाने केलेल्या तिच्या वर्णनावरून व भरताने आपल्या नाट्यशास्त्रांत जे प्रयोगविषयक सामाजिक दंडक व नियम घालून दिले आहेत त्यावरून स्पष्ट आहे. नाटक हें काव्याचा अेक प्रकार असल्यामुळे तें वाचतांहि येतें व पाहतांहि येतें. यामुळे अेकवेळ नाटक अेकट्यानेच स्वतःच्या खोलींत बसून वाचणें व त्या रीतीने त्याचा आनंद घेणें शक्य होअील; पण त्याचा प्रयोग मात्र अेकट्याने पाहवणार नाहीं. तो समुदायांत बसूनच पाहिला पाहिजे. हीच गोष्ट चित्रपटाच्या बाबतींतहि खरी आहे. मात्र नाटकाप्रमाणे चित्रपटाचे संवाद व त्यांतील गाणीं, हीं स्वतःच्या खोलींत अेकटें बसून अेखाद्याला वाचतां आलीं तरी, त्यांचा यथार्थ रसास्वाद मात्र त्याला त्या रीतीने घेतां येणें शक्य नाहीं. चित्रपटांत शब्दनिष्ठ रसनिर्मितीला फारच थोडा अवसर असतो. त्यांतील बहुतेक सारें रंजक तत्त्व त्याच्या दृश्यात्मक भागावर अवलंबून असतें. या भागाचे रसग्रहण प्रेक्षकाला अेकट्याने करतां येणार नाहीं; तें त्याला अितर प्रेक्षकांच्या संगतींतच शक्य होतें. प्रेक्षकांशिवाय सुन्या पडलेल्या अेखाद्या नाट्यमंदिरांत नाटक अगर चित्रपट चालू असतां जी नुरसता प्रेक्षकाला त्यांत आढळून येत नाही, ती तेंच नाटकगृह प्रेक्षकांनी भरगच भरलेलें असलें आणि रंगभूमीवरील किंवा पडद्यावरील नाट्यप्रसंगांना प्रेक्षकांच्या सहृदय प्रतिक्रियेची सहजसंभव साथ मिळत असली म्हणजे आपोआप आढळून येअूं लागते. याचें कारण, प्रत्येक प्रेक्षकाचें मन अितर प्रेक्षकांच्या सामुदायिक मनाशीं अेकजीव होणें हें या प्रकारच्या कलाकृतींच्या आस्वादासाटी आवश्यक असतें, हें आहे. या कलांची निर्मिति आणि त्यांचा रसास्वाद हीं दोन्ही सामुदायिक मनावर अवलंबून आहेत. अेकाकी वैयक्तिक मनांना या गोष्टी शक्य नाहीत. त्यामुळे नाटक व चित्रपट या कला व्यक्तिनिष्ठ न राहतां सामाजिक स्वरूप पावतात; आणि अुलटपक्षीं त्यांच्यावर सामाजिक प्रवृत्ति, विचार, अभिरुचि व अपेक्षा यांचा परिणाम होणें अनिवार्य होतें.

सामुदायिक करमणुकीचें साधन म्हणून चित्रपटाला सार्वत्रिक लोकप्रियता प्राप्त झाली आहे, याचें कारण या कलेचें हें सामाजिक स्वरूपच होय. ही कला अद्याप आपणांला कांहीशी नवी आणि अपरिचित आहे. आपल्या सामाजिक जीवनांत जरी ती अेक मोठी कुतूहलाची आणि सार्वत्रिक चर्चेची अुपयुक्त बाब होअून बसली असली, तरी अजून तीबद्दल आपणांला पुरेशी शास्त्रीय दृष्टि आलेली नाही. चित्रपट काढणारे चित्रपट काढतात, पाहणारे ते पाहतात, त्यांवर अभिप्राय देणारे आपापले अनुकूल-प्रतिकूल अभिप्राय देतात, शाळा-कॉलेजांतील

* म. सा. परिषदेच्या 'स्वाध्यायमंडळा'तर्फे ता. ३ जुलै १९४३ रोजी "कला व समाजजीवन" या विषयावर झालेल्या व्याख्यानांतील कांही भाग– आवश्यक ते फेरफार करून.

विद्यार्थी आणि ज्यांना पुरेसा रिकामा वेळ आहे असे अरुण-तरुण स्त्रीपुरुष, चित्रपटव्यवसायांत काम करणाऱ्या स्त्रीपुरुषांचे पगार, त्यांची राहणी, त्यांचें नैतिक व कौटुंबिक जीवन, त्यांचीं खरीं खोटीं मतें, यांबद्दलच्या रसमरित वार्तालापांत त्यांच्याबद्दल स्वतःला वाटणारें कौतुक व असूया व्यक्त करीत असतात. अशा रीतीने आपल्या सार्वजनिक जीवनांतील बराचसा माग जरी चित्रपटविषयक कौतुक व वार्ता यांनी निःसंशय व्यापून टाकलेला असला, तरी आपल्या सामाजिक जीवनावर चित्रपटांचा प्रत्यक्ष कांही बरावाईट परिणाम होत आहे, किंवा होणार आहे, अशा गंभीर दृष्टीने या विषयाकडे फारसें कोणी पाहत नाही; आणि स्वाभाविकच या सर्व वार्तालापांना रिकामपणची कामगिरी यापेक्षा विशेषसें अधिक महत्त्व येत नाही.

अगदी नुकती नुकती अशी स्थिति होती व अजूनहि बरीचशी आहे. परंतु 'संस्कृति-संरक्षकमंडळा'चे अेक आधारस्तंभ श्री. कृष्णराव मराठे हे सेवानिवृत्त होअून त्यांनी आपलें लक्ष्य साहित्यांतील अश्लीलता व पाविच्यविडंबन यांच्या बरोबरीनेच चित्रपटांतील असदभिरुचि व शृंगारिक प्रसंग यांचें निर्मूलन करण्याकडे वळविल्यामुळे व त्यांच्या प्रयत्नांना सरकारदरबारीं यश मिळूं लागल्यामुळें, चित्रपटविषयक चर्चा हा अेक गंभीर विषय होअूं पाहत आहे; व आतापर्यंत याबाबत अुदासीन असलेले प्रेक्षकहि चित्रपट पाहतांना या गोष्टींवर डोळ्यांत तेल घालून पाहारा ठेवूं लागले आहेत.

श्री. कृष्णराव मराठे यांच्याबद्दल कुणाचीं कांही मतें असलीं, तरी अेक गोष्ट मात्र नाकारतां येणार नाही की ते प्रामाणिक आहेत. स्वतःला योग्य वाटणाऱ्या गोष्टींचा निरलस प्रचार व अनिष्ट वाटणाऱ्या प्रवृत्तींचा प्रतिकार ते तळमळीने आणि कळकळीने करीत असतात. त्यांची दृष्टि कदाचित् आकुंचित असेल, त्यांची विचारसरणी प्रतिगामी असेल, त्यांना कलेचा विषय व्हावा असें वाटणारी त्यांची जीवनकक्षा संकुचित असेल, पण हें मात्र निश्चित की, अितकें असलें तरी त्यांची दृष्टि समाजहिताची आहे. ते म्हणतात त्या प्रमाणांत किंवा त्या रीतीने नसलें, तरी बऱ्याच अंशीं आपल्या चित्रपटसृष्टींत सदभिरुचीच्या रास्त मर्यादांबाबतहि बरेंचसें अराजक माजून राहिलें आहे, पुष्कळशी बेबंदशाही बोकाळली आहे; आणि त्या अनिष्ट प्रथांचें नियमन-नियोजन होअून कांही तरी विशिष्ट सार्वजनिक सदभिरुचीचे निर्बंध, सर्व चित्रपटनिर्मात्यांकडून पाळले जाणें, सामाजिक व सांस्कृतिक प्रगतीच्या दृष्टीने, अवश्यक व हितकारक आहे.

श्री. मराठे यांच्यासारख्या अेखाद्या व्यक्तीने स्वयंस्फूर्तीने हें कार्य शिरावर घेतलें म्हणजे ज्यांना अशा प्रकारचें नियमन नको असतें त्यांना त्या व्यक्तीला, "तुम्ही कोणाचे प्रतिनिधि? तुम्हांला या बाबतींत काय अधिकार?" अशासारखे सहज सुचणारे अडवणुकीचे प्रश्न विचारणें फारच सोपें आणि सोयीचें असतें. या प्रश्नांनी हे स्वयंभू समाजसुधारक गोंधळतात किंवा डगमगतात असें नाही; पण कांटावर बसून मौज पाहणाऱ्या कांही व्यक्तींचा बुद्धिभेद करण्याला मात्र हे प्रश्न चांगलेच अुपयोगी पडतात; आणि विशिष्ट मर्यादेपर्यंत त्यांत सत्याचा अंशहि असतो. मात्र या सत्याच्या अंशाचा विधायक अुपयोग करण्याच्या दृष्टीने हे अडवणुकीचे प्रश्न विचारले जात नाहीत; तर आपल्याला नको असलेल्या विचारप्रणालीच्या प्रचाराला मुळाशींच खुडून नेस्तनाबूत करण्याचा हा गोंडस, स्वार्थी प्रयत्न असतो. अेखाद्या विशिष्ट व्यक्तीचें मतप्रदर्शन व प्रचार जर अनधिकारी व अप्रातिनिधिक असेल, तर अधिकारी व प्रातिनिधिक मतप्रदर्शन व प्रचार होअील अशी व्यवस्था त्या चळवळ्या व्यक्तीचा

अधिकार व प्रातिनिधिकत्व नाकारणाऱ्यांनी केली पाहिजे. पण ती तशी होत नाही. कारण त्यांना प्रातिनिधिक किंवा अप्रातिनिधिक, अधिकृत किंवा अनधिकृत, स्वतःच्या हिताविरुद्ध जाणारें कोणतेंच मतप्रदर्शन नको असतें; आणि म्हणूनच कोणताच विधायक प्रयत्न न करतां फक्त विशिष्ट मताला अनधिकृत व अप्रातिनिधिक म्हणून स्वस्थ बसणें, किंबहुना थोडें पुढे जाऊन त्याच्यावर मागसलेपणाचा शिक्का मारून त्यास हास्यास्पद ठरवणें, हेंच त्यांच्या फायद्याचें असतें.

या दृष्टीने चित्रपटविषयक सामाजिक नियंत्रणाच्या प्रयत्नांना घेण्यांत येणारे कांही आक्षेप विचार करण्यासारखे आहेत. उदाहरणार्थ, असें म्हणण्यांत येतें की, "प्रेक्षक चित्रपट पाहतात ते ती अेक करमणुकीची बाब म्हणून. त्यांच्या सामाजिक किंवा नैतिक जीवनावर त्यांचा परिणाम असा कांही होतच नाही. तेव्हा असदभिरुचीच्या प्रसाराची ओरड म्हणजे कांही अुपद्‌व्यापी मंडळींचा अव्यापारेषु व्यापार आहे. बरें, यदा कदाचित् चित्रपटांतून कोठे सदभिरुचीचा भंग होत असला, तरी योग्यायोग्य पाहून जें काय बरें वाअीट करावयाचें तें करावयाला सरकारने बोर्ड ऑफ सेन्सॉर्स नेमलें आहेच. त्यांच्या कामांत ही आगंतुक ढवळा-ढवळ कशाला ? आणि शेवटीं, कांही लोकांनी असदभिरुचीच्या नांवाने कितीहि आरडा-ओरड आणि गिल्ला केला, तरी जोपर्यंत बहुसंख्य प्रेक्षक असले चित्रपट अहमहमकेने पैसे देअून पाहत आहेत, तोपर्यंत या मूठभर लोकांच्या आरडाओरडीचा चित्रपटनिर्मितीचा व्यवसाय करणाऱ्या व्यापारी दृष्टीच्या लोकांवर काय परिणाम होणार !"

वर वर पाहतां हे आक्षेप बिनतोड आहेत असें वाटेल, तरी थोडा खोल विचार केला असतां ते तसे नाहीत हें सहज कळून येअील. लोक करमणूक या दृष्टीने चित्रपट पाहतात, विवेचक दृष्टीने पाहत नाहीत, म्हणूनच त्यांतील आकर्षक व अुठावदार भागांचा परिणाम त्यांच्या मनावर नकळतच विशेष अुत्कटपणें होतो. चित्रपटप्रेमी स्त्रीपुरुषांचे पोषाख, त्यांची चालचलणुक, त्यांचें बोलणें-वागणें, यांच्यावर थोडी शोधक नजर फिरवली तर त्यांचे आवडते चित्रपट, त्यांतील गाणीं व संवाद आणि नट-नटी यांच्या वर्चस्वाची त्यांच्यावर दाट छाप पडलेली आहे, असें आढळून येअील. चित्रपट हा आरशासारखा आहे. तो समाजाचें प्रतिबिंब दाखवतो. पण या आरशाची काच नितळ नाही. ती हें प्रतिबिंब जसेंच्या तसें दाखवीत नाही. ती सुखसंचारक कंपनीच्या विचित्र शेरबिनीसारखी विकृतिदर्शक आहे. चित्रपटरूपी आरशाच्या काचेवर पडणारें समाजाचें प्रतिबिंब विनोदासाठी विकृत झालेलें किंवा परिणामकारकतेसाठी अतिशयोक्त बनलेलें असतें. या काचेवरील प्रकाश पुन्हा परावर्तन पावून जेव्हा समाजावर पडतो, तेव्हा त्याचें मूळचें स्वरूप पालटून गेलेलें असल्यामुळे समाजावर होणाऱ्या त्याच्या परिणामांत आपणांला अेका नव्याच सृष्टीचें दर्शन घडून येतें. ज्यांच्या मनःप्रवृत्ति स्थिर झालेल्या नाहीत अशा अर्धशिक्षित व अर्धविकसित मनाच्या व्यक्तींवर हा विकृत किंवा अतिरिक्त परिणाम विशेष प्रमाणांत घडून आलेला दिसून येतो. चित्रपटाची ही अुलटी मायावी दुनिया खरीखुरी सत्यसृष्टि आहे असें त्यांना वाटत असतें. गुन्हेगारीला अुदात्त व आकर्षक स्वरूप देणारे आणि कामवृत्तींना चालना देअून त्यांबद्दल विकृत कुतूहल निर्माण करणारे चित्रपट विद्यार्थ्यांच्या मनोवृत्तींवर अनिष्ट परिणाम घडवून आणतात, ही गोष्ट आधुनिक शिक्षणशास्त्रज्ञांनाहि आता पटूं लागली असून ते तिची दखलगिरी घेअूं लागले आहेत.

या संबंधांत योग्य ते अुपाय योजावयाला सरकारी बोर्ड ऑफ सेन्सॉर समर्थ व पुरेसें आहे ही कल्पनाहि भ्रामक आहे. सरकारी कायदेशीर नियंत्रणापेक्षा स्वयंस्फूर्त लोकमताचें अैच्छिक

दिग्दर्शन हें केव्हाहि अधिक जिवंत, अधिक प्रभावी व अधिक अुपयुक्त असतें. सरकारी नियंत्रण-संस्था नियम आणि पद्धति यांच्या चाकोरींत अितक्या जखडलेल्या असतात की, त्यांना समाजाच्या वाढत्या, बदलत्या गरजांबरोबर आपली गति टिकवितां येत नाही; यामुळे त्या अनेक वेळां प्रगतीचा मार्ग खुंटविण्याला मात्र कारणीभूत होतात. वारंवार चालना देअून लोकमताला त्यांना आपल्याबरोबर आणावें लागत असतें. यामुळे तात्त्विक दृष्ट्याहि त्यांचें नियंत्रण लोकमताअितकें प्रगतीला पोषक ठरूं शकत नाही. सरकारी नियंत्रणसंस्था प्रतिबंध निर्माण करूं शकतील पण जनतेच्या अभिरुचीला वळण देअून ती सुसंस्कृत करण्याचें विधायक कार्य त्यांना करतां येणार नाही. तें सामाजिक स्वयंनियंत्रणालाच शक्य आहे. लोकमताच्या आदराने चित्रपटनिर्मात्यांनी स्वतःच्या धोरणांत फरक करण्यांत जें सौकर्य व सौजन्य आहे, तें कायद्याच्या बडग्याच्या धाकाने त्यांच्याकडून तो करवून घेण्य त नाही. चित्रपटनिर्माते हेहि जनतेचेच घटक आहेत. ते जनतेच्या अभिरुचीची, मतांची कदर बाळगणार नाहीत असें मानण्यास फारसें कारण नाही. ते व जनता यांचे संबंध परस्परपोषक व पूरक असेच आहेत. तत्कालिन फायद्याच्या मोहाने त्यांपैकी कांहींची जनतेच्या सदभिरुचीची जाणीव कधी कधी बोथट होत असल्याचें आढळून आलें, तर ती जाणीव त्यांना योग्य मार्गाने करून देणें हें जनतेचें कर्तव्य आहे. कायद्याचा बडगा वेळीं अवेळीं त्यांच्या पाठीवर लगावल्याने किंवा सारखा त्याचा धाक त्यांना दाखवीत राहिल्याने, अेकाच समाजांतल्या चित्रपटनिर्माते व चित्रपटसुधारक या दोन घटकांतील वितुष्ट मात्र वाढत राहील; व त्यामुळे करमणुकीसाठी चित्रपट पाहणाऱ्या प्रेक्षकांचें नुकसान होअून चित्रपटकलेच्या स्वाभाविक प्रगतीला पायबंद बसेल. चित्रपटकला समाजांतील अनेक घटकांच्या सहकार्याने व सहविचाराने विकसित होणारी सामाजिक कला आहे. परस्परविरोधाची वृत्ति तिला विघातक असून राष्ट्रीय हितालाहि तीमुळे धोका पोहोंचल्यावांचून राहणार नाही. यासाठी चित्रपटनिर्माते व समाजसुधारक यांमधले स्नेहसंबंध कसे वाढतील व त्या दोघांच्याहि सहकार्यांतून निरोगी सामाजिक करमणूक व प्रगतिपर सामाजिक कला यांची अभिवृद्धि कशी होअील, याचा विचार झाला पाहिजे; त्यासाठी कांहीतरी योजना झाली पाहिजे.

अशा प्रकारची योजना परिणामकारक होणार नाही, चित्रपटनिर्माते ती मान्य करणार नाहीत, अशी ज्यांना भीति वाटते त्यांना अुदाहरणादाखल अेवढेंच विचारतां येअील की, चित्रपटनिर्मात्यांकडून चित्रपटांच्या ज्या जाहिराती दिल्या जातात त्यांत लोकप्रिय पुढारी, कुटुंबवत्सल विदुषी व शिक्षणतज्ज्ञ यांच्याकडून आपल्या त्या चित्रपटाची मनधरण झाली असल्याची ग्वाही अनेक वेळां कंठरवाने दिलेली आढळते ती कां? पैसे खर्चून दिलेल्या जाहिरातींत धंद्याच्या दृष्टीने निरुपयोगी असलेलीं प्रमाणपत्रें छापून घेण्याअितके चित्रपटाचे प्रसिद्धितज्ज्ञ मूर्ख असतात काय? अर्थात्च, या प्रसिद्ध स्त्रीपुरुषाचे अनुकूल अभिप्राय जर त्यांना आपल्याला फायदेशीर होतातसे वाटतें, तर अुलटपक्षीं त्यांचेच प्रतिकूल अभिप्राय आपणांला हानिकारक होणार नाहीत असें त्यांना वाटणें कसें शक्य आहे? आणि चित्रपटनिर्माते झाले, तरी फायदा मिळवणें यापलीकडे दुसरीं कांही सामाजिक, राष्ट्रीय, कौटुंबिक कर्तव्यें व मूल्यें ते अोळखीतच नसतील, असें तरी कां गृहीत धरून चालावयाचें? त्यांनाहि समाजांतील अितर घटकांप्रमाणेच बायकामुलें, आप्त-स्वकीय नसतील काय? आपण काढलेल्या बऱ्यावाअीट चित्रपटांचा आपल्या बायकामुलांवर व आप्त-स्वकीयांवर कांहीतरी बरावाअीट परिणाम होत असला पाहिजे, हें आपण त्यांच्या ध्यानांत

आणून दिलें तरी ते तिकडे लक्ष देणार नाहीत असें समजण्याअितके आपण त्यांना आपल्या-बाहेरचे कां मानावें ? 'फिल्म अिंडिया' या अिंग्रजी मासिकांत, गुन्हेगारीला गोंडस स्वरूप देण्याऱ्या चित्रपटव्यवसायांतील प्रवृत्तीबद्दल, बालमानसशास्त्रज्ञ व शिक्षणतज्ज्ञ यांच्याकडून अलीकडे जें जोरदार विरुद्ध मतप्रदर्शन होत आहे, विशेषतः चित्रपटनिर्मितीशीं प्रत्यक्ष संबंध असलेल्या व्यक्तींकडून त्यांच्या बरोबरीने त्यांत जो माग घेतला जात आहे, त्यावरून काय अनुमान निघतें ? शिक्षणतज्ज्ञ व समाजशास्त्रज्ञ यांना ज्या गोष्टी अनिष्ट वाटतात त्यांची जाणीव चित्रपटनिर्मिति करणाऱ्यांनाहि हळूहळू होअूं लागली आहे, याचाच हा पुरावा नव्हे काय ?

आज या बाबतींत जशी आपल्याकडे परिस्थिति आहे, अगदी बरोबर तशीच परिस्थिति कांही वर्षांपूर्वी अमेरिकन चित्रपटव्यवसायांत अुत्पन्न झालेली होती. गुन्हेगारीला आणि स्त्री पुरुषांतील स्वैर संबंधांना गोजिरवाणें गोंडस स्वरूप देअून त्यांच्याबद्दल सामान्य प्रेक्षकांच्या मनावर अेक प्रकारची विकृत मोहिनी घालणाऱ्या चित्रपटांचा त्या वेळीं तेथे अतिशय सुळ-सुळाट झाला होता. या परिस्थितीला आळा घालण्याचें कार्य तेव्हा तेथील चित्रपटव्यवसा-यांत प्रामुख्याने वावरणाऱ्या अेका समाजसुधारकाने आपल्या शिरावर घेतलें. या गृहस्थाचें नांव, वुअिल. अेच्. हेस. शिक्षक-पालक-संघ, धार्मिक संस्था, स्त्रियांच्या संस्था, धर्मोपदेशक, शिक्षणशास्त्रज्ञ, समाजशास्त्रज्ञ अित्यादींच्या साहाय्याने त्याने आपलें अुद्दिष्ट साध्य केलें. चित्रपटव्यवसायाला जनतेच्या सदभिरुचीची कदर करण्याला, तिचा मान राखण्याला, माग पाडलें. अर्थात् हें करतांना हेसची दृष्टि अनुभवी व व्यापक असल्यामुळे, जनतेलाहि तो चित्रपटव्यवसायाकडे राष्ट्रीय हिताच्या दृष्टीने पाहण्याचा आदेश देत असे. परस्परसहकार्याने, आदराने व विचारविनिमयाने, चित्रपटव्यवसाय व कला यांची राष्ट्रीय हिताच्या दृष्टीने अभि-वृद्धि कशी होअील हें धोरण डोळ्यांपुढे ठेवून, त्याने चित्रपटनिर्मात्यांना स्वखुषीने लोकमताला जबाबदार राहण्याची तडजोड करण्यास माग पाडलें; चित्रपटव्यवसाय व सामाजिक सदभिरुचि यांचा समन्वय केला; त्या भरभक्कम पायावर त्यानें आपल्या 'स्वयंनियंत्रणाच्या योजने'ची अुभा-रणी केली. तो म्हणतो,—

"अितर बहुतेक कलांप्रमाणे (चित्रपट) ही कला दरबारी वातावरणांत वाढलेली नाही. तिला स्वतःचे खास मिरास हक्क नाहीत. जनतेच्या गरजा, जनतेची अभिरुचि, करमणुकींतील सभ्यपणा आणि चांगुलपणा यांबद्दलच्या जनतेच्या कल्पना, यांच्याशीं तिचें स्वरूप सुसंगत असलें पाहिजे. ती लोकशाहीचें औरस संतान आहे. आजच्या तिच्या प्रभावी अवस्थेंत तिला आपल्या अधिकारांची आणि कार्यक्षमतेचीं जाणीव असून त्याबरोबरच स्वतःवरील जबाबदारी पार पाड-ण्याची तिची तयारी आहे. प्रत्यक्ष जीवनाने पुरविलेल्या किंवा साहित्याने घडवलेल्या नानाविध विषयांतून स्वतःला पाहिजे असेल त्या प्रकारची करमणूक स्वतःला अनिर्बंधपणें निवडतां यावी, या जनतेच्या स्वातंत्र्याचा जास्तींत जास्त विकास करणें ही चित्रपटव्यवसायांतील स्वयंनिर्ण-याच्या कल्पनेची तात्त्विक भूमिका नेहेमी होती व आहे. 'चित्रपटाचें स्वातंत्र्य' याचा अर्थ, अेखाद्या चित्रपटगृहांत गेलें असतां तेथे जो कांही करमणुकीचा कार्यक्रम चाल-लेला असेल, तो शालेय, धार्मिक अगर कौटुंबिक परिणामांशीं सपशेल विरोधी असणार नाही, अशी प्रेक्षकाला खात्री बाळगतां येण्यासारखी परिस्थिति अस्ति-त्वांत असणें; स्वयंनियंत्रणयोजनेचा शिक्का असलेल्या चित्रपटांतून सार्वजनिक सभ्यता व शिष्टाचार यांच्या सामान्य नियमांचा अतिक्रम झालेला नसणारच

अशी निरपवाद निश्चिति राहणें; आणि कला किंवा करमणूक या नांवाच्या बुरख्याखाली 'टिंगलबाजी'ला मिरवायला मुभा नसणें; हा आहे...हें स्वातंत्र्य स्वयंनियंत्रणाच्या योजनेनें चित्रपटाला मिळवून दिलें आहे आणि या हक्कांचें संरक्षण आम्हीं करण्याचें ठरविलें आहे."*

हेसच्या या दृष्टिकोणांतील निश्चितपणा, व्यापकपणा व विधायकता हीं श्री. मराठे यांच्या व्यापारांत येत नसतील हें संभवनीय आहे; पण त्यांना या गोष्टी अभिप्रेत नसतीलच असें मात्र वाटत नाही. जनता आणि चित्रपटनिर्माते यांच्या परस्परसहकार्यानें विल्. अेच्. हेसच्या योजनेसारखी स्वयंनियंत्रणाची योजना तयार होऊं शकली, तर पदोपदीं सेन्सॉरच्या फर्मानांना पाचारण करण्यांत ते मोठें भूषण मानतील असें नाही. जनतेंतील जबाबदार, पुढारी, शिक्षक, पालक, समाजशास्त्रज्ञ यांची ही सामुदायिक जबाबदारी आहे व त्यांच्या प्रातिनिधिक व अधिकारयुक्त मतप्रदर्शनाला मान देणें हें चित्रपटनिर्मात्यांचें कर्तव्य आहे. कायद्यानें लादलेल्या बोर्ड ऑफ सेन्सॉर्सच्या हुकूमशाही कारभाराअैवजी जनतेच्या स्वयंप्रेरणेनें विकसित झालेली स्वयंनियंत्रणाची अैच्छिक योजना चित्रपटव्यवसायांत आपणांला परिणामकारक करतां आली, तर कला व सार्वजनिक सदभिरुचि या दोहोंच्याहि प्रगतीच्या दृष्टीनें तें हितावहच ठरेल. वैयक्तिक प्रयत्न हे बहुशः अेकांगी व मर्यादित असल्यामुळे अेका बाजूनें ते अयशस्वी व हास्यास्पद ठरतात, तर दुसऱ्या बाजूनें विधिनिष्ठ नियंत्रणाला वारंवार हस्तक्षेप करण्याची संधि मिळून, अैनजिनसी कला आणि आर्थिक व्यवहार या दोन्ही दृष्टींनी राष्ट्रीय हिताला अपायकारक व नुकसानीचे होतात. या अनवस्थेच्या निरासाचा अेकमेव अनुभवाचा अुपाय म्हणजे स्वयंनियंत्रणाचा, तडजोडीचा व सहकार्याचा मार्ग हा होय. आमचे चित्रपटनिर्माते, चित्रपटसुधारक अेकदिलानें या मार्गाचा विचार करतील तो सुदिन.

---

* "Unlike most of the arts it was not reared in patrician surroundings. It has no vested rights. It must conform to public demands, public taste and the public's sense of decency and goodness in entertainment. It is a true child of democracy. To-day in full vigour it recognizes its privileges and opportunities, and realizes and acknowledges its responsibilities."

"The underlying philosophy of self-regulation in the motion picture industry always has been, and is, based on the developing of the greatest measure of liberty for the public to choose its entertainment from the variety of themes posed by life or created by literature. *Freedom of the screen means opportunity to attend a theatre with the knowledge that the entertainment will not negative the influence of the school, the church and the home; the certainty that pictures bearing the seal of self-regulation will not violate the cannons of common decency, that banality shall not masquarade as art or entertainment.* .... This is the liberty which self-regulation has brought to the screen, and this is the right we propose to protect." (Italics ours.) —Motion Picture Herald, Vol. 136, No.3, pp.25-26.

# अितिहास-परिषद् — अध्यक्षीय भाषण

(श्री. गो. स. सरदेसाई, कामशेत)

[म. सा. परिषदेने ता. १-२ जून १९४३ या दिवशीं भरविलेल्या अितिहासविषयक परिषदेच्या अध्यक्षीय भाषणांतील कांही महत्त्वाचे अुतारे खालीं दिले आहेत. स्थलसंकोचास्तव समग्र भाषण देणें शक्य झालें नाही म्हणून वाअीट वाटतें.]

१. आजपर्यंतच्या अभ्यासाने अितिहासविषयक कित्येक कायमचीं तत्त्वें मला पटून बसलीं आहेत. कालमानाप्रमाणे तीं बदलणारीं आहेत. अितिहासाचा प्रत्यक्ष अुपयोग आम्हां मानवांस बिलकूल नाही. सुताराचें किंवा गवंड्याचें काम केलें तर थोडीबहुत मजुरी तरी मिळेल, ती देखील अितिहासापासून प्राप्त होणार नाही. शाळा-कॉलेजें नसतीं तर मला वाटतें अितिहासाकडे कोणीं ढुंकूनदेखील पाहिलें नसतें. शालोपयोगी पुस्तकें लिहिणारांना व प्रकाशणारांना कांही थोडी प्राप्ति होते, पण खरा अितिहास बनविणारे राजवाडे-खऱ्यांसारखे प्रचंड अभ्यासक आजन्म दरिद्री राहिले. यास्तव मी म्हणतों, अितिहासाचा अुपयोग प्रत्यक्ष असा कांही नाही. पण मनुष्यस्वभावच असा आहे की यशापयशाच्या बाबतींत मागील काळाकडे पाहून तो त्याची कारणपरंपरा शोधूं लागतो. ती खरी किंवा बिनचूक असतेच असें नाही, पण तिच्यावर त्याचा विश्वास बसतो, त्यास धीर येतो, नुकसान झालें तर सुधारणेचा मार्ग शोधून काढतो. अशा प्रकारची ही मानसिक कसरत प्रत्येक अिसम आपापल्यापुरती मार्गदर्शी करून घेतो. कसरत करणाराच्या मगदुराप्रमाणे ती व्यक्तीस व राष्ट्रास कमीअधिक अुपयोगी पडते. मराठ्यांचें राज्य अनेकांनी कष्टाने कमावलें तें क्षणमात्रांत नाहीसें झालें. या घोर परिणामाची चिकित्सा शत्रु-मित्रांनी करून आपापल्यापरी निदान ठरविलें. आपल्याकडे गोपाळराव हरि देशमुख, विष्णुशास्त्री चिपळूणकर, ज्योतिबा फुले, न्यायमूर्ति रानडे, संशोधक राजवाडेप्रभृतींनी चर्चा करून कित्येक तत्त्वें ठरविलीं. हा जसा अेक दाखला सांगितला, तशाच प्रकारें पूर्वीच्या मोगलांचे व अितर अितिहास बनत गेले. अर्थात् हा अितिहास म्हणजे ज्याचीं त्याचीं वैयक्तिक मतें होत. मनुष्याची बुद्धि कोती व स्वार्थी असल्यामुळे अितिहासकाराच्या कृतींत त्याचे वैयक्तिक मनोविकार अुतरत जातात. त्यांत अस्सल सत्याचा मामा फारच अल्प असतो. शिवाजीनें अफझलखानास मारलें, किंवा पानपतावर मराठ्यांचा पराभव झाला, अेवढें अल्प सत्य स्थूलमानाने स्वीकारतां आलें तरी तेवढ्याने आपली जिज्ञासा भागत नाही. हे प्रकार कां घडले, कसे घडले, त्यांतील यशापयशाबद्दल जबाबदार कोण, त्यांत नीति-अनीति कोणीं किती पाळली अशा प्रकारची चिकित्सा करणें हेंच अितिहासाचें मुख्य प्रयोजन असून लेखकाच्या भावनेप्रमाणे तें भिन्न बनत जातें. गतगोष्टींचें विवेचन करतांना आधार ध्यानांत घ्यावे लागतात. आज आपल्या सभोंवार प्रचंड युद्ध चालू आहे, त्यांतील प्रत्येक घडामोडींत सत्यांश किती हें जर आपणांस नक्की ठरवितां येत नाही तर गतकालीन अितिहासाचा प्रकार काय सांगावा ! अितिहासांत सत्य धुंडाळण्याचा प्रयत्न निष्फल असून हें सत्य ज्याच्या त्याच्या भावनेप्रमाणे बदलत जाणारी वस्तु होय.

मग आपणांस अितिहासाचा अुपयोग काय हा प्रश्न प्रामुख्याने पुढे येतो. त्या संबंधाने

अितकेंच सांगतां येअील की गतकालाची पुष्कळशी बरीचाअीट माहिती अितिहासावरून विद्यार्थ्यांस मिळते, भाराभर गतकालीन वृत्तें जमा करून त्यांवरून कार्यकारणभाव ठरविण्याची कसरत त्याच्या बुद्धीस अल्पस्वल्प मिळते. हे केवळ आनुषंगिक अुपयोग अितिहासाचे झाले. पण माझ्या मतें सर्वांत मोठा फायदा राजकारणी पुरुष आपापल्या मतलबसिद्धीकडे गतकालीन अितिहासाचा कसा करून घेत आहेत हें मनांत आणलें तर पूर्वीच्या मानाने आजच्या मनूंत केवढें परिवर्तन घडून येत आहे याची आपणांस कल्पना होअील. प्रत्येक राष्ट्राचें राजकारण आज कुशल मुत्सद्दी मागील अितिहासावर खेळवीत आहेत. युरोपांत हिटलरने पहिल्या जागतिक युद्धाचा अनुभव आपल्या हातीं राजसत्ता मिळविण्याकडे कसा केला हें आपण जाणतों आणि आता ती सत्ता आपल्या हातीं टिकविण्याकडे तो करीत आहे. याच पायावर त्याने सर्वाधिकार पैदा करून जर्मन राष्ट्राचा जम बसविला. अिटली, रशिया अित्यादि राष्ट्रांचे धुरीण तोच प्रकार आपापल्या राष्ट्रासाठी करीत आहेत. मुख्य प्रधान चर्चिल पांच हजार वर्षांचा हिंदुस्थानचा अितिहास लपवून अलीकडील शेपन्नास वर्षांतला ब्रिटिश साम्राज्यशाहीचा जो बोलबाला गाजला तो तसाच पुढे चिरस्थायी करण्याचा हट्ट धरीत आहे. त्याचा सुघड भाव असा दिसतो, हिंदी लोकांनो, तुम्हीं नेभळेपणाने आपलें राज्य गमावून आमचा आश्रय केला. आता तुमचें संरक्षण करण्याची जबाबदारी आमचेवर आली ती आम्हांस सोडतां येत नाही. आमचे हातून तुमचें संरक्षण न होअूं शकलें तर आम्ही आमचे दोस्त जे अमेरिकन त्यांचें साहाय्य घेअूनहि आम्ही आपली जबाबदारी पार पाडूं. मी प्रधानकीवर आहें तोपर्यंत तुमच्या संरक्षणाचा अन्य मार्ग मी स्वीकारणार नाहीं. आफ्रिकेचे सर्वाधिकारी स्मट्स्साहेब चर्चिलची पृष्ठरक्षा करीत आहेत.

पाकिस्तानचे पुरस्कर्ते जनाब जिना गतकालीन अितिहासाचा अुपयोग कसा करितात तेंहि ओघाने ध्यानांत घेण्याजोगें आहे. ते सांगतात, हिंदु हो, आम्हीं अल्पसंख्याकांनी बाहेरून येअून तुम्हा नेभळ्यांस जिंकिलें, तुमचीं मंदिरें धुळीस मिळविलीं, मूर्ति फोडिल्या, तुम्हांस बाटवून आम्हीं आमची संख्या वाढविली, पांचशें वर्षें तुमच्या मानेवर आम्हीं आपल्या सत्तेचें जूं बसविलें, असे आम्ही पराक्रमी असतां आज तुम्ही आम्हांस भलत्याच गमजा सांगूं लागलां तर आम्ही त्या बिलकूल चालूं देणार नाहीं. अशा रीतीने जो तो आपल्या मतलबाकडे मागील अितिहासाचा अुपयोग करून कसा घेतो त्याचीं थोडीं ठळक अुदाहरणें आज आपल्या दृष्टिसमोर असलेलीं ओघास आलें म्हणून सांगितलीं.

## २. मराठ्यांच्या अितिहासाचें वैशिष्ट्य.

मराठ्यांनी शेपन्नास वर्षेंपावेतो हिंदुस्थानावर सार्वभौम सत्ता गाजविली. बाळाजी विश्वनाथाने बादशाही सनदांनी बादशहास आपल्या छत्राखाली घेतल्यापासून थोरल्या माधवरावाच्या मृत्यूपर्यंत, किंबहुना सवाअी माधवरावाच्या अंतापर्यंत, हिंदी राजकारणाचें केंद्र सातारा-पुण्यांतून हालत होतें. पेशव्यांना विचारल्याशिवाय कोणतेंहि महत्त्वाचें राजकारण परभारें सिद्धीस जात नव्हतें. अनेक राजकारणी पुरुष व राज्याचे हक्कदार पुण्यांत येअून वर्षानुवर्षे खटपट करीत. या संबंधाचा भरपूर पुरावा डोळे अुघडून पाहाणारास स्पष्ट दिसेल. आज जशी हिंदी जनतेची आरोळी अमेरिकेच्या कानापर्यंत पोंचूं नये अशी कारवाअी घडत आहे तशाच प्रकारची कारवाअी शेदीडशे वर्षांपासून आमच्या अितिहासासंबंधाने चालत आली असून ती हाणून पाडण्याचा योग्य प्रयत्न आम्हीं बिलकूल केला नाहीं. मराठ्यांच्या अितिहासाचें खरें

हृद्गत व त्यांतील प्रसिद्ध व्यक्तींची कर्तबगारी आमची आम्हांसच जर नीट समजली नाही तर ती बाह्य जगास कशी पटणार? अेक तर असा पुरावा दाखविणारें साहित्य अलीकडेस बाहेर आलें असून तें मराठी भाषेतच अडकून पडलें आहे. शिवाय आमच्या संशोधकांनी अिंग्रजी भाषेवर बहिष्कार घातल्यामुळें आमचा सर्व पुरावा बाह्य जगास अज्ञात राहिला. स्वराज्याचा ताजा अनुभव प्राचीन काळीं व अलीकडच्या यादवांनंतरचा फक्त मराठ्यांचा आहे आणि त्याबाबत भरपूर राजकारणी अुत्कृष्ट कागद मराठ्यांशिवाय दुसऱ्यांचे नाहीत. या दोनच गोष्टींनी मराठी अितिहासास वैशिष्ट्य आलें आहे; अितकेंच नव्हे तर त्यांतील विषयांतहि अेक प्रकारचें हृदयंगम कौतुक भरलेलें आहे, तें या प्रसंगीं दाखविणें, मला वाटतें, युक्त होअील.

पराक्रमी व्यक्ति राष्ट्राला भाग्यास चढवून त्याचा अितिहास बनवितात हा आजचा अनुभव मराठशाहींत अुत्कृष्ट व्यक्त झाला. छत्रपति शिवाजी, बाजीराव व थोरले माधवराव पेशवे, तसाच हातींतोंडीं घास आलेला सवाअी माधवराव अित्यादि राष्ट्रपुरुषांचे मृत्यु अकालीं झालेले पाहून मनास अवर्णनीय अुद्वेग वाटतो. हे अंत वाचवत नाहीत आणि वाचल्यावर वाटतें आमच्या देशाचा अुद्धार होअूंच नये अशी परमेश्वराची अिच्छा आहे कीं काय? औरंगजेबास चहूंकडून ग्रासीत आणून त्यास समग्र गिळण्याची संपूर्ण तयारी झाली असतांच शिवाजीमहाराजांना केवळ पन्नाशींत अकस्मात् मृत्यु यावा आणि औरंगजेबाने ८९ वर्षें जगावें हा दैवयोग नाही तर काय? शिवाजीला आणखी दहापांच वर्षें अवधि मिळता तर पुढचा अितिहास साफ बदलून गेला असता. बाजीरावाची तीच गत. निजाम, बादशहा, पोर्तुगीज, अिंग्रज अित्यादि विरोधकांस ज्या बहादराने दातीं तृण धरून पायांशीं लोटांगण घेण्यास लाविलें त्याला चाळिशींतच मृत्यु यावा, नुसतीं पांचचार वर्षें जास्त मिळूं नयेत, हा कांय अीश्वराच्या घरचा न्याय म्हणावा? थोरल्या माधवरावाने तर सर्व शत्रु पादाक्रान्त करून अठ्ठाविशींत कारभार आटोपला. त्याला आणखी दहापांच वर्षें मिळतीं तर हैदर, अिंग्रज, राघोबा अित्यादींचें कांडात निघालें असतें. लगेच सवाअी माधवराव जन्मास आला. समस्त राष्ट्रास वाटलें थोरल्या माधवरावानेच आपले अपुरे कार्यभाग संपविण्यासाठी पुनः अवतार घेतला. करतळींच्या फोडाप्रमाणे सर्वांनी त्याची जोपासना केली आणि आता दैन्य संपलें असें वाटूं लागतांच त्यानेहि अकल्पित रीतीने अिहलोकांतून प्रयाण करावें यास केवळ अिंग्रजांची सद्दी अेवढेंच म्हणतां येअील. या बनावाने द्वितीय बाजीरावास समग्र राज्य बुडविण्याची संधि मिळाली. हे प्रकार कार्यकारणभावाने सोडवितां आले तरी ते विचारशक्तीस कुंठित केल्याशिवाय राहत नाहीत. मराठ्यांचें राज्य बुडण्याचीं हीं धडधडीत कारणें दृष्टिआड करून शस्त्रास्त्रांची हेळसांड, जातिभेद, आर्थिक दैन्य अशीं नानाविध असंबद्ध कारणें शोधीत बसण्याची सवय आम्हांस अिंग्रज लेखकांनी शिकविली, ती अद्यापि आपण मान्य करीत आहों. Human destinies are often regulated by the play of the contingent and the unforeseen (Fisher's History of Europe.) म्हणजे आकस्मिक अतर्क्य घडामोडी होअून मानवी व्यवहारास भलतेंच स्वरूप प्राप्त होतें असें अेक विद्वान् आधुनिक अितिहासकार म्हणतो त्यांतच पुष्कळ तथ्य आहे.

मराठ्यांच्या अितिहासांत आणखी अनेक अुच तत्त्वें भरलेलीं आहेत. मुसलमानांनी या देशावर राज्य केलें, मराठ्यांनी केलें, आज अिंग्रज कसे करीत आहेत तें तर आपण प्रत्यक्षच पाहत आहों. मराठ्यांच्या समग्र अितिहासांत मुसलमानांच्या तोडीचा अेकहि अत्याचार

दाखवितां येणार नाही. तयमूरलंगासारखे त्यांनी शिरांचे मनोरे रचले नाहीत, अब्रूरक्षणासाठी बायकांना जोहार करावे लागले नाहीत. गुलामकादरासारखी बादशहाची व त्याच्या पवित्र सिंहासनाची विटंबना केली नाही. औरंगजेबाने बंधु दाराचें शिर कापून तें सुवर्णपात्रांत आपल्या पित्यास नजर केलें, असले अमानुष प्रकार मराठ्यांच्या अंतःकरणास शिवलेहि नाहीत. अेका नारायणरावाच्या स्वजातीय खुनापलीकडे निष्कारण वध त्यांनी शत्रूचाहि केला नाही. संभाजी छत्रपति व संताजी घोरपडे यांचे खून करवून औरंगजेबाने कृतकृत्यता मानली, पण त्याच संताजीच्या हातांत त्याचा सन्मान्य अुमराव खानाजादखान युद्धांत पाडाव आला असतां संताजीने त्यास आपली संरक्षक फौज देअून बादशहाचे भेटीस पाठवून दिलें. नादीरशहाने बादशाही धुळीस मिळविली आणि तख्त रिकामें झालें असतां संतमालिकेंत शोभणाऱ्या शाहू छत्रपतीने पेशव्यास आज्ञा करून बादशाहीचा सांभाळ केला; निक्षून कळविलें की नवें मंदिर अुभारण्यापेक्षा जुन्याचा जीर्णोद्धार करण्यांतच जास्त पुण्य आहे.

पण मराठ्यांच्या अितिहासांतले असले अुच्च नीतीचे मासले विध्वंसकांपुढे सांगून काय अुपयोग! ज्यांना सत्य, न्याय, परोपकार, गरीबाचें संगोपन अशा अुच्च गुणांची दरकार वाटत नाही आणि जे दुष्ट स्वार्थाने अंध बनले आहेत त्यांना त्यांच्याच तोडीचे अुपाय शिकविल्याशिवाय कसें भागणार? हल्लीच्या महायुद्धाच्या मनूंत तर हजारो वर्षें मान्य झालेलीं जीवितमूल्येंच साफ बदलून गेलीं असून थापेबाजीला अूत आला आहे. पण अिंग्रजांची ही कावेबाज राजनीति आज नवीन निर्माण झालेली नसून ती पूर्वीपासूनच आपल्या अितिहासाच्या बोकांडीस बसलेली आहे. प्राचीन काळापासून मुसलमानांच्या आगमनापर्यंत या भूमीला आर्य हें सार्थ नांव प्राप्त होअून जीवनाचीं मूल्यें कायम होअून बसलीं. सर्व जन्तुजाताला अुच्च पदवीप्रत पोंचवायचें, सर्वांच्या सुखाची— पशुपक्ष्यांची देखील— सोय पाहायची हा त्या पूर्व मनूचा दंडक होता. त्यांत बळी तो कान पिळी या अधम तत्त्वाला जागा नव्हती. या प्राचीन अुच्च तत्त्वाला पहिला धक्का मुसलमानांनी— गझनीचा महंमूद, अल्लाअुद्दीन खिलजी, तयमूरलंग प्रभृतींनी दिला. तुझ्यापाशीं आहे तें तुला ठार करून मी जबरदस्तीने घेणार या न्यायाचा अवलंब करून त्यांनी या सुवर्णभूमीची संपत्ति लुटून बाह्य देशांत नेण्याचा पायंडा पाडिला. ही प्रथा अेतद्देशीय आर्यांना मान्य नव्हती. धर्माच्या बाबतींत कोणीं कोणावर जबरदस्ती करूं नये हें तत्त्व आर्यांनी पाळून यवन, अिराणी, शक, हूण असे नानाविध परदेशीय लोक हिंदभूमींत वेळोवेळीं आले त्या सर्वांस त्यांनी आत्ममय करून सोडिलें. पण जेव्हा त्यांना पुढे मुसलमानांच्या संहारक स्वभावाची पारख झाली तेव्हा त्यांस धर्मबाह्य ठरवून दूर ठेविलें. मुसलमानांच्या पश्चात् युरोपीय लोक या देशांत आले, त्यांनी जरी मुखाने व्यापाराचा व शान्तीचा जप चालविला आणि मंदिरें व मूर्ति प्रत्यक्ष फोडल्या नाहीत तरी आपल्या जहांबाज राजकारणाने अनेक युक्त्यांनी द्रव्यशोष करून या सुवर्णभूमीला दारिद्र्यांत लोटलें. त्याचे कष्ट आपण अद्यापि अनुभवीत आहों.

## ३. अितिहासाचा बुद्धिपुरःसर विपर्यास.

पाश्चात्यांच्या जबरदस्त राजकारणाने मराठ्यांचा अुज्ज्वल अितिहास अत्यंत विकृत बनला आहे. मराठ्यांनी सगळ्या लोकांस नागविलें, जाचलें, लुटलें, त्यांचा छळ केला, प्रत्यक्ष मोगल बादशहास कैदेंत वागविलें अशी भलतीच ओरड करून, आम्ही आलों म्हणून तुमची सुटका होअून तुम्हांस सुखाचे दिवस दिसले अशी त्यांनी राजपूत, बंगाली, कानडी

अित्यादि मराठेतर राष्ट्रिकांची समजूत घातली. लेक, डेल्ली, माल्कम, अेल्फिन्स्टन अित्यादि बहाद्दुरांनी जो हा विपर्यास चालू केला त्याचाच अनुवाद अितर अितिहासकारांनी असा कांहीं बेमालून करून सोडला की मराठ्यांना अितिहासांत स्थानच राहिलें नाही. मोगलांचे अनुयायी अिंग्रज बनले. अशा या विकृत अितिहासावर आम्ही शेदीडशे वर्षें पोसलों. अद्यापि महाराष्ट्राच्या युनिव्हर्सिटींत मराठ्यांना स्थान नाही. आमच्या संरक्षणाची, आमच्या अन्नवस्त्राची जबाबदारी अिंग्रजांनी आपल्याच हातीं घेतली, त्याचप्रमाणे आमच्या बुद्धीस काय खाद्य पुरवायचें याचाहि निर्णय आपण करून त्या धोरणाने 'पब्लिक अिन्स्ट्रक्शन' या भपकेबाज नांवाखाली आमचें अेकंदर स्वत्व त्यांनी हिरावून घेतलें आहे.

शिवाजी महाराजांपासून तों अखेरपर्यंत मराठ्यांचें ध्येय अेकच होतें. आपले धर्माचार निर्वेध पाळण्याची स्वतंत्रता मराठ्यांना पाहिजे होती. आमचीं मंदिरें व तीर्थक्षेत्रें यांस मुसलमानांनी अुपद्रव देअूं नये, तीं हिंदूंच्या ताब्यांत असावीं, अेवढाच मराठ्यांचा प्रयत्न होता. मुसलमानांचें राज्य किंवा धर्म ते बुडवीत नव्हते. सदाशिवरावभाअूने, माधवराव पेशव्याने, महादजी शिंद्याने बादशहास मुद्दाम आणून पदापन्न केलें. पानिपतचा झगडा धार्मिक स्वरूपाचा बिलकूल नव्हता. नजीबखानाने धर्म बुडाला अशी खोटीच आरोळी मतलबास्तव ठोकून आपला कार्यभाग साधला. आमच्या घरांत आम्हीं मालक असावें, दुसऱ्यांचें घर आम्हांस नको, हाच अेकंदर मराठ्यांच्या राजकारणाचा मथितार्थ असून तो शिवाजी महाराजांनीं औरंगजेबास लिहिलेल्या कानअुघाडणीच्या सुप्रसिद्ध पत्रांत अुत्कृष्ट व्यक्त झालेला अितिहासांत नमूद आहे.

## ४. अिंग्रज साम्राज्याचा वडेजाव ?

मराठ्यांविरुद्ध ही जी प्रचंड हाकाटी अुर्फ प्रॉपागँडा पूर्वीपासून व अद्यापिहि चालू आहे ती अुलटवून आपल्या अितिहासाचें सत्य स्वरूप जगापुढे प्रतिष्ठितपणें स्थापन करणें हें माझ्या मतें आपल्या साहित्यिकांचें व संशोधकांचें आद्य कर्तव्य होय. मी जेव्हा जेव्हा बाह्य प्रांतांत प्रवास करतों तेव्हा अेक गोष्ट प्रामुख्याने नजरेस येते की आम्हां मराठ्यांसंबंधाने मोपण गैरसमज व प्रखर तिरस्कार बाहेर सर्वत्र पसरलेला आहे. आपला सर्वांचाहि हाच अनुभव असेल. दिवसेंदिवस ही ओरड व ही हाकाटी वाढत आहे. तिला आळा घालण्याचा प्रयत्न आम्ही बिलकूल करीत नाहीं. याचें मुख्य कारण हिंदी भाषा आपण स्वीकारीत नाहीं आणि अिंग्रजीवर बहिष्कार घातला. मग आमचें हृद्गत कितीहि जीव तोडून आम्हीं मराठींत मांडलें तरी त्याचा फैलाव बाहेर कसा होणार? राजवाड्यांच्या प्रस्तावना अुच्च दर्जाच्या आहेत, त्या जर अिंग्रजींतच त्यांनी लिहिल्या असत्या तर त्यांचा फैलाव हिंदुस्थानभर होअून सर्व युनिव्हर्सिट्यांतून त्यांचा अभ्यास चालू राहता. आज कलकत्ता, मद्रास, नागपूर, बनारस येथील विश्वविद्यालयांतून मराठी अितिहासाचा अभ्यास चालतो तितकाहि मुंबअींत त्याला प्रवेश नाही. जनतारूपी न्यायाधीश हजर आहे, त्यांजपुढे आमच्या विरुद्ध फिर्याद देअून वर्षें लोटलीं, पण आमचें डिफेन्स, आमचा बचाव, आमची कैफियत किंवा केसच जर आपण मांडीत नाहीं, आमचा पुरावा जर आम्ही त्यांजपुढे आणीत नाहीं, तर त्यांत कसूर कोणाची ?

## ५. आमची कैफियत दाखल करण्याची निकड.

प्रसिद्ध व्यक्तींचें स्वभावचित्र यथातथ्य रेखाटून त्या व्यक्ति वाचकांपुढे जिवंत अुभ्या करणें हें अितिहासांतलें कठिण पण महत्त्वाचें काम होय. मराठ्यांच्या अितिहासांत शिवाजी,

बाजीराव, शाहू छत्रपति, सदाशिवरावभाऊ, माधवराव पेशवे अित्यादींचे स्वभावविशेष व कर्तबगारी दाखविणारीं कितीतरी बहुमोल पत्रें खुद्द त्यांचीं व अितरांचीं आज अुपलब्ध असून तीं बाह्य अभ्यासकांस कळत नाहीत, त्यामुळे वरील थोर व्यक्तींसंबंधाने बाहेर मिथ्या ग्रह पसरलेले आहेत. अर्थात् मराठ्यांची राजनीति व त्यांचें अंतःकरण व्यक्त करणारे हजार पांचशे निवडक अुत्तमोत्तम कागद अिंग्रजींत रूपान्तर करून बाहेर आणणें अत्यंत जरूर आहे पूर्वी रॉलिन्सन साहेबानी अेक ल्हानसें सोर्सबुक बाहेर आणलें, पण तो प्रयत्न तेवढ्यावरच थांबला. माझा बहुतेक युनिव्हर्सिट्यांशीं संबंध आला, आणि हमेश माझ्याकडे पृच्छा येतात, आणि कित्येक अभ्यासक कामशेतला येअूनहि राहिले आहेत, त्यांत मला आढळलें आमची कैफियतच जगापुढे नाही याबद्दल बाहेरच्यांसहि हळहळ वाटते. पण हें काम अेकट्यादुकट्याचें नाही, तें सर्वांच्या सहकारानेच होण्याजोगें आहे.

मला हि कांही अिंग्रजीचा मोठा प्रेमा वाटतो असें नाही. अिंग्रजी कोर्टें चालू झालीं तेव्हापासून त्याच भाषेंत सर्व न्यायाचा व्यवहार चालून केवढा जबरदस्त भुर्दंड जनतेवर बसला आहे पाहा. पण निर्वाह नाही त्यास अिलाज काय ? महाराष्ट्रीयाने लिहिलेलें अेकहि शिवाजी-चरित्र बहुजनांस मान्य होणारें अद्यापि अिंग्रजींत लिहिलें गेलें नाही. असें चरित्र लिहिण्याची वेळ आली नाही ही सबब न कर्त्याचा वार शनिवार या स्वरूपाची मला वाटते. याचा परिणाम असा झाला की जें जदुनाथ सरकारांचें शिवाजीचरित्र आपण दोषार्ह समजतों त्यावरच आज पाव शतकपावेतो हिंदी जनता पोसली जाअून त्यांतले दोष मात्र दिवसेंदिवस दृढमूल होत आहेत. जनता क्षुधित आहे, तिला चांगलें अन्न मिळालें नाही तर कदान्न खाअून निर्वाह करील, अुपाशी राहणार नाही. शिवाजीमहाराज व माधवराव पेशवे हे दोन आपले प्रमुख राष्ट्रपुरुष. पहिल्याचें चरित्र जनतेस पुरविण्याचा मान अेका बंगाली परस्थाने घेतला. मी समजत होतों माधवरावांचें चरित्र तरी अिंग्रजींत पुरविण्याची संधि अेखाद्या महाराष्ट्रीयास मिळेल. पण गेल्या महिन्यांत बॅनर्जी नांवाच्या अेका गृहस्थानी लिहिलेलें त्या पेशव्याचें अिंग्रजी चरित्र माझे हातीं पडून याहि बाबतींत माझी निराशा झाली. काळाच्या अुदरांत आणखी काय आहे कोणीं सांगावें ? बॅनर्जींचें अिंग्रजी चरित्र पुष्कळ सरस निपजलें आहे हें सांगण्यास संतोष वाटतो. मुंबअी, मद्रास, कलकत्ता येथील अप्रसिद्ध अिंग्रजी दप्तरें धुंडाळून हें पुस्तक लिहिलें असल्यामुळे अिंग्रजमराठ्यांचे हर्षामर्ष त्यांत चांगले सप्रमाण दाखविले असून दहापांच वर्षें तो पेशवा जगता तर अिंग्रजांचा रिघाव येथे झाला नसता असें निश्चित वाटूं लागतें.

आजच्या आपल्या कर्तव्यासंबंधी विचार करितां आपला पुरावा व तदनुरोधाने आपल्या अितिहासाची मुख्य कैफियत अिंग्रजींत व हिंदींत अथवा जमेल तर दोनहि भाषांत मांडणें हीं दोन निकडीचीं कामें समोर आहेत. आपल्या भावी पिढीच्या राजकारणासाठीहि या कामांची अत्यंत आवश्यकता आहे. कारण या भावी पिढींतूनच अेखादा शिवाजी पुनः निर्माण होअून देशोद्धार करणार आहे. त्याची पूर्वतयारी करून देण्यास आम्ही चुकतां कामा नये. त्यासाठी आपल्या अेकंदर साधनसाहित्याची छाननी करून होणें जरूर आहे. निदान अेक लाख छापील पृष्ठें सहज होतील अेवढा या साहित्याचा विस्तार आज असून बरींचशीं पुस्तकें दुर्मिळ आहेत, त्यांचें पुनमुद्रण झालें पाहिजे. सर्व साहित्य अेकत्रित असलेले संग्रह पांच दहाच फार तर असतील. भाषेचे, कल्पनेचे, अुत्कृष्ट साहित्याचे मासले, अपरिचित शब्द, म्हणी, रचना वगैरे वैचित्र्य यांत मुबलक मिळूं शकेल. मराठशाहींतील गद्यरचना या विषयावर स. १९१८

सालीं अिंदूरच्या साहित्यसंमेलनापुढे मीं अेक निबंध वाचला होता. त्यानंतर राजवाड्यांचे खंड, पेशवे दप्तरांचे भाग अित्यादिकांत आलेल्या चांगल्या चांगल्या पत्रांची मीं निवड करून ठेविली असून माझ्या सर्व पुस्तकांत प्रत्यंतरसंदर्भ म्हणजे क्रॉस-रेफरन्सिस मुद्दाम लिहून ठेविले आहेत. माझ्या अशा टिपणांचें बाड पुष्कळच वाढलें आहे.

६. प्रस्तुतचें कर्तव्य.

मराठींतलें प्रचंड साधनसाहित्य अत्यंत अव्यवस्थित रीतीनें छापलेलें असून अभ्यासकांस तें सर्व अेकदम हाताशीं मिळेल अशी सोय नाही. व्यक्तिसूची, विषयसूची, शब्दकोश, अिंग्रजींतील बक्लंडसारखा चरित्रकोश अशीं साधनें अवश्य पाहिजेत तीं नाहीत. कालक्रमानें जुळविलेल्या वंशावळींची फार मोठी जरुर आहे. शिवाय महाराष्ट्राप्रमाणेच अितर प्रांतांतून, अितर भाषांतून निरानिराळ्या संस्थांमार्फत किंवा व्यक्तिशः नानाविध संशोधन महाराष्ट्राबाहेर पंजाब, अयोध्या, बंगाल, कर्नाटक अशा दूरदूरच्या प्रांतांत सारखें चाललें असून त्याची दखल घेतल्याशिवाय मराठ्यांचा अितिहास पूर्ण होणार नाही. सगळ्या युनिव्हर्सिट्यांतून कितीतरी विषयांवर प्रबंध लिहिले जात आहेत, अशांच्या फलाचा अुपयोगहि आपल्या अितिहासांत झाला पाहिजे. मराठ्यांच्या अितिहासाची पार्श्वभूमि म्हणजे शिवकालापूर्वीच्या दोनतीनशे वर्षांच्या घडामोडी अर्थात् स्थूलमानाने ज्ञानेश्वरापासून तुकारामापर्यंतचा काळ निश्चित स्वरूपांत मांडण्याअितकी सामग्री आज अुपलब्ध आहे, पण ती सर्व अेकत्रित करून मुसलमानांचें आक्रमण व तन्निवारणार्थ हिंदूंनी केलेले प्रयत्न यांचा संगतवार अितिहास लिहिला जाअील तर मराठ्यांचा अुत्कर्ष कां व कसा झाला याची आधारभूत मीमांसा अभ्यासकांस मिळेल. या कार्यास चारदोघांनी तातडतोब वाहून घ्यावें अशी माझी सूचना आहे.

---

# थोडीशी रसचर्चा

[लेखक– डॉ. के. ना. वाटवे, पुणें.]

'महाराष्ट्र-साहित्य-पत्रिके'च्या जानेवारी १९४३ च्या ६५ व्या अंकांत प्रो. रा. श्री. जोग यांनी माझ्या 'रसविमर्श'चें सविस्तर परीक्षण केलें आहे. त्यांत त्यांनी परीक्ष्य ग्रंथांतील कांही महत्त्वाच्या बाबींबद्दल आपला मतभेद व्यक्त केला आहे. त्यावर आत्मसमर्थनपर असें मला थोडें लिहावयाचें आहे. मूळ परीक्षण अगदी निर्विकार मनानें व शुद्ध शास्त्रीय चर्चेच्या भूमिकेवरून लिहिलें असल्यानें मीहि माझा खुलासा त्याच वृत्तीनें करीत आहें. ही व्यक्तिनिरपेक्ष अशी शास्त्रीय चर्चा आहे. म्हणूनच 'प्रत्युत्तर' किंवा यासारखें कांही अधिक झुंजार मथळा न देतां मीं माझ्या या खुलाशाला 'रसचर्चा' असें निर्विकार नांव दिलें आहे व तेंच धोरण शेवटपर्यंत राखलें आहे.

प्रो. जोगांचीं मतभेदस्थळें चारपांच आहेत. पण स्थलसंकोचास्तव या लेखांत त्यांपैकीं अेकाबद्दलच संक्षेपाने लिहितों. बाकीचीं यथावकाश विचारांत घेतां येतील.

वाचकाच्या ज्या मुख्य व स्थिर चित्तवृत्ति काव्यवाचनाने व्यक्त होअून रसरूप पावतात त्यांस संस्कृत साहित्यशास्त्रांत 'स्थायिभाव' म्हणतात. त्या चित्तवृत्तींचें विवेचन मानसशास्त्राधारें करतांना मीं त्यांना त्या शास्त्रांतील Sentiment शीं तुल्य कल्पिलें आहे. प्रो. जोगांना हें मान्य नाही. त्यांच्या मतें 'जुन्या स्थायिभावांचें साम्य Primary emotionsशीं अधिक आहे.' 'कारण Sentiments हे रसिकाच्या हृदयांत अितके स्थिर नसतात' (पृ. ५८). कारण 'अेक शाकुन्तल वाचतांना अेकाच बैठकीला प्रथम शृंगार, नंतर वत्सल व नंतर शोकाचा अनुभव येतो' असें ते म्हणतात. या त्यांच्या विधानावरून असें दिसतें कीं वाचकाच्या हृदयांत कांही भाव स्थिर व दीर्घकाल राहतात या संस्कृत 'स्थायि'तेच्या कल्पनेलाच प्रो. जोगांचा विरोध आहे व म्हणून स्थायिभावास Sentiment मानणें त्यांना योग्य वाटत नसावें किंवा संस्कृत स्थायिभावकल्पना मान्य असूनसुद्धा त्यांच्याशीं Sentiments हे तुल्य आहेत हें म्हणणेंच तेवढें त्यांना संमत नसावें. हे दोन्हीहि विकल्प खरे धरून मी खुलासा करतों.

(१) संस्कृतांत स्थायिभावाचें जें स्थिरत्व मानिलेलें आहे तें साधे भाव (Emotions) व संचारी किंवा व्यभिचारी भाव (Derived emotions) यांच्या अपेक्षेने. कारण भाव हे क्षणिक असतात व स्थायिभाव मात्र वासनारूप असल्याने चित्तांत कायमचे राहतात. ते नेहमी सुप्त (Quiescent) असून काव्यवाचनाने जागृत होतात. त्यांची विभावानुभावादि सामग्री थांबली की ते पुन्हा सुप्त होतात. दुसऱ्या स्थायिभावाला अुचित सामग्री निर्माण झाली की तो जागृत होतो. याप्रमाणे अेकाच शाकुन्तलाचें वाचन चालू असतांना निरानिराळे स्थायिभाव प्रसंगपरत्वें जागृत व सुप्त होतात. स्थायिभावाला जें स्थिर म्हटलें आहे तें तो चित्तांत नेहमी कायम असतो म्हणून. त्याचें सुप्त होणें हें त्याच्या अस्थिरत्वाचें लक्षण नव्हे. त्याचें हें दिसणारें अस्थिरत्व सामग्रीलोपजन्य आहे खरें नव्हे. 'स्थिरवृत्ति' हा पर्यायहि मी स्थायिभावालाच व याच अर्थी योजला आहे हें रसविमर्श पृ. ९५ वर केलेल्या 'शृंगारस्थिरवृत्ति' अित्यादि शब्दप्रयोगावरून दिसून येअील.

(२) स्थायिभावाला Sentiment मानणें कसें आवश्यक आहे याचा विस्तृत खुलासा मीं र. वि. पृष्ठें ११३ ते १२३ वर केला आहे. तसेंच Primary emotion, Sentiment, भाव व स्थायिभाव यांचीं लक्षणें व त्यांतील भेद मीं अनुक्रमें पृ. ८५, ९५, ९६, १०६–१११ येथे स्पष्ट केला आहे. Emotion (भाव) ही मनाची अेक तात्पुरती व तरल हालचाल (Activity) आहे, तर Sentiment ही या Emotion चीच (ते अेखाद्या विषयावर केंद्रित झाल्याने) मनांत बनणारी पक्की संघटना (Structure) आहे. शिवाय स्थायिभाव जसे व्यभिचारी भावांशीं संलग्न होतात तसेच Sentiment बनून त्यांचा व्यापार सुरू झाला की निरनिराळीं Derived emotions मनांत तरळूं लागतात. पुत्रवात्सल्याच्या Sentiment मुळेच पुत्राविषयी चिंता, आशा, निराशा, आनंद अित्यादि अुत्पन्न होतात. या गोष्टी नुसत्या Emotion ने घडत नाहीत. Emotions विषयांशीं संलग्न होअून मनांत पक्के मुरल्यामुळेच त्या विषयाची स्मृति होअून कल्पनेंतहि तो विषय खेळूं लागतो व अितर भाव अुत्पन्न करतो. रसास्वादाच्या कालीं तर काव्यगत व्यक्ति व त्यांचे हास्यशोकादि मनोव्यापार यांची रसिकाल

जी प्रतीति होते ती केवळ कल्पनाव्यापारानेच. पण कल्पनाव्यापार तर योड्या तरी पूर्वानुभवाशिवाय सुरू होत नाही. म्हणून वाचकाच्या मनाला स्पर्श करून नाहीसे होणाऱ्या चंचल Emotion ऐवजी त्याच्या मनांत पक्का मुरलेला Sentiment च तेथे मानणें सयुक्तिक आहे. प्रतिक्षिपस्वरूपाच्या (Reflexive) भावनालहरी अर्भकाच्या मनावरून येतात व जातात. पण तें जसें मोठें होत जातें तसें त्याच्या मनांत भोवतालच्या जगाबद्दलच्या वाढत्या अनुभवाने Sentiments बनूं लागतात, व ते पुढे पक्के होतात. या Sentiment मुळेच त्याचा स्वभाव बनतो व त्याचा सर्व व्यवहारहि त्यांवरच चालतो काव्यगत पात्रांचे ठायीं Sentiments असतात हें प्रो. जोगांना मान्य दिसतें. पण त्यांची शंका रसिकहृदयांत Sentiments असतात कीं नाही, व असले तरी ते काव्यगत व्यक्तींचेच असतात कीं काय, याबद्दलची आहे.

मनुष्यप्राणी या नात्याने रसिकाच्या हृदयांतहि Sentiments असतात. मात्र रसिकाचे Sentiments काव्यगत पात्रांचेच नसतात, तर तत्सदृश असतात. वाचकांचा पात्रांशीं जो 'हृदयसंवाद' होतो तो यामुळेच. अेका जुन्या काळच्या अज नांवाच्या राजाचा विलाप वाचून आजचा अेक सामान्य स्थितींतला रसिक कां गहिंवरतो? याचें कारण पत्नीविरहाबद्दलच्या दोघांच्या कल्पना सारख्या आहेत. 'डार्सी अथवा अेलिझाबेथ, हॅम्लेट किंवा मॅक्बेथ यांचे सेंटिमेंट्स रसिकाचे नसतात' पण ते तत्सदृश मात्र असतात. याचा अर्थ काव्यगत पात्रांना आलेला प्रत्यक्ष अनुभव वाचकास यावाच लागतो असा नव्हे. मृत पुत्र किंवा मृत पत्नी यावरील काव्याचा आस्वाद घ्यावयास वाचकाचा पुत्र किंवा पत्नी मेलेली असण्याची जरूरी नाही. (तसें असेल तर आस्वाद अुत्कट होअील हें मात्र निश्चित.) पत्नीविरह, पुत्रविरह, शत्रूवरील सूड अित्यादिबद्दलचे वाचकाचे Sentiments जसे प्रत्यक्ष अनुभवाने बनतात तसे ते श्रवण, वाचन व कल्पना यांनीहि बनतात. मात्र असे Sentiments पुसट व क्वचित् कमजोर असतात. ज्या मानाने वाचकाचे Sentiments अंधुक व पुसट त्या मानाने त्याचा पात्रांशीं 'हृदयसंवाद' व तज्जन्य रसास्वाद फिका होतो. प्रत्येक काव्य वाचावयास व त्याचा आस्वाद घ्यावयास प्रत्येक वाचक सारखाच योग्य कधीहि नसतो.

स्थायिभाव हे सेंटिमेंट्स आहेत या माझ्या मताबाबत जोगांचा आक्षेप असा की सेंटिमेंट्स ह्या 'मनुष्यस्वभाव कमी अधिक प्रमाणांत स्थिर बनविणाऱ्या मनोवृत्ति' आहेत त्यामुळे काव्यास्वादाशीं त्यांचा काय संबंध? यावर अुत्तर हें की वर म्हटल्याप्रमाणे मानवाचा सर्वच व्यवहार सेंटिमेंटस्वर चालला आहे. सेंटिमेंट्स हे स्वभावहि बनवतात व काव्यास्वादहि घडवून आणतात. शिला भित्तिरचना करीत असल्या तरी आपल्या स्निग्ध पृष्ठावर त्या काव्यलेख धारण करतातच. प्रो. जोग पुन्हा म्हणतात 'Sentiments म्हणजे जर स्थायिभाव असतील तर नवीन मानसशास्त्राने मान्य केलेले मैत्री, अभिमान, द्वेष, आदर अित्यादि जे Sentiments आहेत त्यांना स्थायिभाव म्हणणें प्राप्त होअील'. मानसशास्त्राने मान्य केलेले सर्वच्या सर्व Sentiments काव्यशास्त्र स्थायिभाव म्हणून घेअीलच असें नाही. त्यांतील जे अुत्कट, आस्वाद्य व व्यापक असतील तेवढेच घेअील. 'प्रेयान्' रसांत मैत्रीचा स्थायिभाव म्हणून समावेश रुद्रटाने केला होता. अभिमान व द्वेष यांचा समावेश वीरांत होतो व आदर हा भक्तींत येअून जातो. याप्रमाणे पहिल्या मतभेदाबद्दल माझा खुलासा आहे. या चर्चेचा विचार तज्ज्ञ वाचकांनी अवश्य करावा.

## धर्म व तत्त्वज्ञान

**श्रीज्ञानेश्वरांचें तत्त्वज्ञान** — ले० डॉ. शं. दा. पेंडसे, अेम्. अे., अेम्. ओ. अेल्., पीअेच्. डी.; प्रका० के. भि. ढवळे, श्रीसमर्थसदन, मुंबअी ४; किं. रु. ४.

डॉक्टरची पदवी ज्याचें निमित्तकारण झाली आहे असा हा अलीकडे मराठींत झालेल्या अुत्कृष्ट ग्रंथांपैकी आणखी अेक ग्रंथ होय. ज्ञानेश्वरीचा अभ्यास किंवा वाचन तीमधील काव्याकरिता करणारे किंवा भक्तिभावाने धर्मग्रंथ म्हणून तो मुखोद्गत करणारे रसिक किंवा भक्त मराठी वाचकांत असंख्य झाले असतील; परंतु विचक्षण दृष्टीने तिचें आलोचन तीमधील तत्त्वज्ञानाच्या दृष्टीने करणारे विरळा. सांप्रदायिकांची दृष्टि तत्त्वज्ञानाअितकीच, किंबहुना अधिक प्रमाणांत, तीमधील रसाकडे, विशेषतः भक्तिरसाकडे असे. यामुळे सागराचें लंघन करणारे (हेंहि काम सोपें नव्हे) बरेच निघतात, पण त्याची खोली व अंतरंग बघणारा मंदर पर्वत अेखादाच, अशापैकी स्थिति होती. डॉ. पेंडसे यांचा प्रस्तुत ग्रंथ हा या दुसऱ्या वर्गांत पडणारा आहे.

ग्रंथलेखनाचें निकटचें कारण जरी डॉक्टोरेट्ची पदवी हें असलें तरी त्याचें खरें निमित्तकारण म्हणजे श्री. पांडुरंगशर्मा यांनी सुमारें वीस वर्षांपूर्वी चित्रमयजगत्मध्ये 'ज्ञानेश्वर-महाराज आणि अितर तत्त्ववेत्ते' या नांवाने लिहिलेली लेखमाला होय. या लेखमालेंत त्यांनी ज्ञानेश्वरांसंबंधीच्या रूढ समजुतींना अनेक धक्के दिले. ज्ञानेश्वरांनी ज्या भाष्यकारांना वाट पुसत ज्ञानेश्वरी लिहिली, ते शंकराचार्यच असें समजण्याचें कारण नाही; ज्ञानेश्वरींत त्यांचें स्वतःचें तत्त्वज्ञान आलें आहे असें नसून तें अमृतानुभव या स्वतंत्र ग्रंथांत पाहावयास हवें; ज्ञानेशांना शंकराचार्यांचा अध्यासवाद किंवा मायावाद मान्य नाही; ज्ञानेशांवर रामानुजमतांचा परिणाम झाला होता; त्यांचें तत्त्वज्ञान पांचरात्र आणि वाल्लभ यांच्याशीं सदृश आहे वगैरे अनेक प्रश्न पं. पांडुरंगशर्मा यांनी अुपस्थित केले होते. प्रस्तुत ग्रंथ हा प्रामुख्याने पांडुरंगशर्मा यांच्या विधानांच्या निराकरणाकरिताच लिहिला गेला असें म्हणावयास प्रत्यवाय नाही. यांतील विषयप्रवेश आणि प्रकरण ३, ४, ७, ९ यांवरून हें स्पष्ट दिसतें. ग्रंथाची कल्पना व मांडणी ही याच हेतूने झालेली दिसते हें करीत असतां अर्थात् ज्ञानेश्वरांचें तत्त्वज्ञान विशद झालेंच आहे. मात्र त्याचें विवेचन आधुनिक तत्त्वज्ञानांतील प्रमुख विचारांच्या अनुरोधाने स्वतंत्रपणें अेकैकशः न करतां वर अुल्लेखिलेल्या हेतूने शंकराचार्य, रामानुज, नाथपंथ, वल्लभ व गौडपाद अित्यादिकांच्या तुलनेने तें सांगितलें आहे व फिरून अेकदा 'आचार्यांचेंच तत्त्वज्ञान ज्ञानेश्वरांनी भक्तिप्रेमाच्या गोड भाषेंत सांगितलें' ही कल्पना स्थापित केली आहे.

तत्त्वज्ञानाची चर्चा करतांना ज्ञानेश्वरांच्या ग्रंथाचा अर्थनिर्णय आधी होणें आवश्यक, किंबहुना ज्ञानेश्वरांचे ग्रंथ कोणकोणते याचाहि निर्णय होणें जरूर होतें. या दृष्टीने योगवासिष्ठ, अुत्तरगीता, प्राकृतगीता, पंचीकरण अित्यादि लेखन ज्ञानेश्वरांचें नसावें असें डॉ. पेंडसे यांनी ठरविलें आहे. तसेंच राजवाडे यांनी ज्ञानेश्वरीची प्रत निर्दोष नसतांहि आज तरी सर्वांत अधिक ग्राह्य आहे असें ठरविलें आहे. अभंगांच्या बाबतींतहि मतभेद आहे. त्या संबंधीचें निर्विवाद व स्पष्ट मत न देतां आलें तरी तें बहुतांशीं ज्ञानेश्वरांचेंच असें धरूनच सारी चर्चा झाली आहे. परिशिष्ट म्हणून ज्ञानेश्वर व वामन पंडित हा तुलनात्मक लेखहि जोडला आहे.

ग्रंथाचें स्वरूप हें असें आहे. या प्रकारचा ग्रंथ लिहिण्यास आवश्यक गुणसंपत्ति लेखकाच्या ठिकाणीं आहे. आवश्यक अशा बारिकसारिक संदर्भग्रंथांचें सूक्ष्म वाचन,

अनुक्रमणिका

भारतीय तत्त्वज्ञानाचा दृढपरिचय, विवेचनाची समतोल, अनाग्रही पण निश्चित अशी पद्धति, सर्व विवादविषय झालेल्या स्थलांची संपूर्ण छाननी करण्यास आवश्यक असा निरलस-पणा व शास्त्रीय लेखनास मूलभूत असलेली पूर्वग्रहविवर्जित मनोवृत्ति हीं डॉ. पेंडसे यांनी या ग्रंथांत सर्वत्र दाखविलीं आहेत. कै. पांगारकरांसारख्या श्रद्धालु चारकऱ्याने आणि प्रो. रा. द. रानडे यांच्यासारख्या आधुनिक चिकित्सक तत्त्वज्ञान्याने केलेल्या मुक्तकंठ स्तुतीस पात्र होण्या-जोगाच हा ग्रंथ आहे.

ज्ञानेश्वरांच्या तत्त्वज्ञानाची ही तौलनिक चर्चा जुन्या भारतीय तत्त्वज्ञानाच्या चौकटींतच झालेली आहे. भारतीय तत्त्वज्ञानाचा विशेष परिचय नसणाऱ्या वाचकांस ती बरीच दुर्बोध वाटण्याचा संभव आहे. पाश्चात्य तत्त्वज्ञानामध्ये जे जे विचार आज महत्त्वाचे समजले जातात त्या प्रत्येकाबाबत ज्ञानेश्वरांना काय म्हणावयाचें आहे हें सांगणारी तौलनिक चर्चा अजून होण्याजोगी आहे. डॉ. पेंडसे यांच्या ग्रंथाचा हेतु हा नसल्याने साहजिकच हें त्यांनी केलें नाही. पाश्चात्य तत्त्वज्ञानाचा दृढ परिचय असणाऱ्या तत्त्वज्ञानाच्या प्राध्यापकांनी तें करावयास हवें. परंतु मराठीमध्ये आणि 'मऱ्हाटी' तत्त्वज्ञासंबंधी लिहावें अशी बुद्धि त्यांना होईल तेव्हा खरें. आज डॉ. पेंडसे यांच्या ग्रंथाने महाराष्ट्रतत्त्वज्ञानवाङ्मयांत जी बहुमोल भर पडली आहे तीवरच समाधान मानावयास हवें. तें समाधान भरपूर प्रमाणांत त्यांच्या ग्रंथाने मिळत आहे यांत शंका नाही.

रा. श्री. जोग

## साहित्यसमीक्षा व वाङ्मयेतिहास

१ **ज्ञानोदयाचीं पहिलीं शंभर वर्षें** (ग्रंथ पहिला, १८४२-१८६१)—संपा० रेव्ह. भा. पां. हिवाळे, एम्.ए., पीएच्.डी. (हारवर्ड), मुंबई १९४२; किंमत १। रुपया.

२ **टीका आणि अभ्यास**—ले० व प्रका० डॉ. रामकृष्ण गणेश हर्षे, १९९/५ सदा-शिव, पुणें २; किं. २। रु.

३ **जीवन-साहित्य**—लेखक श्री. ग. त्र्यं. माडखोलकर; प्रका० कॉंटिनेंटल प्रकाशन, पुणें २; किंमत २॥ रुपये.

अव्वल अिंग्रजींत दर्पण, दिग्दर्शन, प्रभाकर, ज्ञानोदय, ज्ञानप्रकाश, ज्ञानप्रसारक, विचारलहरी अित्यादि अनेक नियतकालिकें महाराष्ट्रांत अुदयाला आलीं. त्यांपैकी बहुतेक वृत्तपत्रें व मासिकें निघाल्यापासून पांचदहा वर्षांतच बंद पडलीं. फार थोड्या नियतकालि-कांनी पंचवीस वर्षांची आयुर्मर्यादा ओलांडली; आणि शताब्दिपूर्तीचा सोहळा पाहण्याचें भाग्य तर फक्त ज्ञानोदयालाच लाभलें. ज्ञानोदयाचें अुद्दिष्ट आणि धोरण मान्य नसलेल्या लोकांनाहि खिस्तीधर्मसंस्थांची ही कार्यनिष्ठा नि चिकाटी निःसंशय अभिनंदनीय व कौतुका-स्पद वाटेल. ह्या शतसांवत्सरिकोत्सवाच्या निमित्ताने ज्ञानोदय पत्राच्या चालकांनी अभ्यास-कांच्या सोयीसाठी जुन्या अंकांतील कांही निवडक लेख ग्रंथरूपाने पुनर्मुद्रित करण्याचें ठरविलें; आणि त्याचा हा पहिला भाग गेल्या वर्षी प्रसिद्ध केला. या भागांत सन १८४२ पासून १८६१ पर्यंतच्या अंकांतील लेखांचा समावेश केला आहे.

अर्वाचीन महाराष्ट्राच्या अितिहासांतील हा कालखंड अतिशय महत्त्वाचा असतांनाहि त्यासंबंधी फारच थोडी माहिती अुपलब्ध आहे. त्या वेळचे बहुतेक ग्रंथ भाषान्तरात्मक आहेत.

तेव्हा तत्कालीन समाजजीवनाच्या धार्मिक, सामाजिक, राजकीय, वाङ्मयीन, शैक्षणिक अित्यादि विविध अंगोपांगांचा अिस्थंभूत अितिहास समजून घेण्यास नियतकालिकवाङ्मयाकडे वळल्याशिवाय गत्यंतर नाही. परंतु हें वाङ्मयहि आजपर्यंत कोणीं आस्थापूर्वक जतन करून ठेवलेलें नाही. कित्येक मासिकांचा अेखादा अंकहि पाहावयास मिळणें आता मुष्कील झालें आहे. कांही नियतकालिकांचीं बांधलेलीं चारदोन पुस्तकें क्वचित् अेखाद्या ग्रंथालयांत आढळतात: पण तेवढ्यावरून त्या काळांतील घडामोडींची समग्र व विश्वसनीय माहिती मिळण्याचा बिलकूल संभव नाही. म्हणूनच "महाराष्ट्र देश म्हणजे त्या वेळीं (१८२०–७०) अेक थंड गोळा होअून पडला होता. या थंड्या गोळ्यास घेअून प्रथमतः माधवरावजींनीच अूब दिली" अशासारखीं अवास्तव विधानें महाराष्ट्रांतील मोठमोठ्या जबाबदार व्यक्तींच्या लेखांतूनहि दृष्टीस पडतात.

सुदैवाने गेल्या शंभर वर्षांतील ज्ञानोदयाचीं सगळीं पुस्तकें सध्या अुपलब्ध आहेत. त्यामध्ये वेळोवेळीं प्रसिद्ध झालेले लेख, बातम्या व वृत्तान्त अैतिहासिक दृष्ट्या फार महत्त्वाचे आहेत. सन १८७० पूर्वी महाराष्ट्र खरोखरच थंडगार गोळा होता काय? त्या काळीं विपन्नावस्थेंतून वर डोकें काढण्यासाठी आमच्या लोकांनी कांहीच धडपड केली नाही का? जांभेकर, महाजन, लोकहितवादी, फुले यांच्यासारखे त्या वेळचे विचारी व वजनदार लोक समाजाबद्दल अितके अुदासीन व बेफिकीर होते काय! ह्या सर्व प्रश्नांची शहानिशा करावयाची झाल्यास खात्रीलायक माहितीसाठीं अगोदर ज्ञानोदयाचे जुने अंक लक्षपूर्वक वाचले पाहिजेत; तेवढेंच अेक साधन तूर्त आपल्या हातीं आहे. परंतु ही गोष्टहि सर्वांना शक्य नाही. म्हणूनच प्रस्तुत लेखसंग्रहासारखे साधनग्रंथ जेवढे प्रसिद्ध होतील तेवढे आपणांस हवे आहेत. त्यामुळे अव्वल अिंग्रजींतील परिस्थितीची बरोबर कल्पना येण्यास पुष्कळच मदत होअील. वर्तमानपत्रें, अनिष्ट चालीरीति, शिक्षण, स्त्रियांचे प्रश्न, प्रजा आणि सरकार, खिस्ती महामंडळ, वाङ्मय, विविध माहिती अशा आठ सदरांत या भागांतील लेखांची विभागणी केली आहे. हा संग्रह अभ्यासकांना तर अुद्बोधक होअीलच पण सामान्य वाचकांनाहि तो मनोरंजक वाटल्याशिवाय राहणार नाही. लेखांची निवडहि बऱ्याच कसोशीने केलेली आहे.

**गं. बा. सरदार**

प्रसिद्ध कवि गोविन्दाग्रज यावरील सुंदर आणि व्यासंगपूर्ण निबंधाने डॉ. रा. ग. हर्षे यांनी मराठी काव्यवाङ्मयाचे सहृदय टीकाकार म्हणून नांव कमाविलें आहे. त्यांच्या सरस लेखणींतून अुतरलेल्या टीकात्मक स्फुट लेखांचा संग्रह प्रस्तुत पुस्तकांत करण्यांत आला आहे. टिळक महाविद्यालयाचें त्रैमासिक आणि रत्नाकर या दोन नियतकालिकांशीं संपादक म्हणून डॉ. हर्षे यांचा संबंध आल्यामुळे त्यांना पुष्कळच प्रासंगिक लेखन करावें लागलें. तथापि त्यांचीं परीक्षणें मामुली पद्धतीचीं नसून परीक्षणविषयक ग्रंथांचा त्यांनी मार्मिक अभ्यास केलेला आहे. प्रस्तुत पुस्तकांतील बहुसंख्य लेख परीक्षणात्मकच आहेत. चरित्र, काव्य, भाषान्तर आणि कादंबरी या वाङ्मयाच्या विविध शाखांमध्ये जीं जीं पुस्तकें त्या वेळीं विशेष गाजलीं त्यांवर त्यांनी आपली चोखंदळ दृष्टि टाकली आहे. परीक्षणविषयक ग्रंथांतील सौन्दर्य वाचकांच्या पुढे मांडण्यांत त्यांचा जसा हातखंडा आहे तसेंच त्या ग्रंथांतील दोषांचें आविष्करणसुद्धा त्यांनी निःपक्षपातीपणें केलें आहे असें दिसून येअील. अभागी कमल, कांहीतरी, गीतद्विदल आणि विरहतरंग या काव्यग्रंथांचीं त्यांचीं परीक्षणें अितकीं सरस वठलीं आहेत की तीं त्यांनी पुनर्मुद्रित करून मराठी वाङ्मयाच्या अभ्यासकांवर अुपकारच केले आहेत असें

म्हणण्याचा मोह आवरत नाही. स्वतंत्र लेखांत 'भावगीता'वरील त्यांचा निबंध अुत्कृष्ट झाला आहे. निरनिराळ्या काव्यप्रकारांवर डॉ. हर्षे यांनी आपल्या ललित भाषाशैलीने असे व्यासंगपूर्ण निबंध लिहिले तर मराठी टीकात्मक वाङ्मयांत चांगल्या प्रकारची भर पडल्याखेरीज राहणार नाही.

यांतील सर्वच लेख पुनर्मुद्रणाला योग्य आहेत असें किंत्येकांना वाटणार नाही. अभिप्रायाला आलेल्या पुस्तकांपैकी कांहींना तात्कालिक महत्त्व असतें. नवीनच प्रकाशित झालेल्या पुस्तकांवर मलेबुरे अभिप्राय संपादकांना द्यावे लागतात. या पुस्तकांना वाङ्मयांत कांही स्थान असल्याखेरीज किंवा ते ते अभिप्राय विशेष अभ्यासयुक्त दृष्टीने लिहिलेले असल्याखेरीज त्यांचें पुनर्मुद्रण करण्यांत स्वारस्य नसतें. हा विवेक डॉ. हर्षे यांनी पाळला असता तर प्रस्तुत पुस्तकाची योग्यता टीकात्मक वाङ्मयांत बरीच वाढली असती. अुदाहरणार्थ, सुवर्णपंचक यावरील अभिप्राय गाळणेंच युक्त झालें असतें. टिळकमहाविद्यालयांत असतांना मराठीवाङ्मय मंडळ काढण्यांत लेखकाने पुढाकार घेतला होता. त्या मंडळाची घटना आणि कार्याची रूपरेषा परिशिष्टांत दिली आहे त्याचेंहि औचित्य नीटसें ध्यानांत येत नाही. मंडळाने केलेल्या भरीव वाङ्मयीन कार्याचें स्वरूप दृष्टीस पडलें असतें तर जास्त आनंद वाटला असता. असो.

वाङ्मयीन मूल्यांची यथार्थ जाणीव, बाह्य वेषभूषा आणि आंतरीय भावनाप्रवाह या दोहीकडे सारख्याच ममत्वाने पाहणारी त्यांची चोखंदळ सौंदर्यदृष्टि, टीकात्मक लेखामध्ये दिसून येणारी ललित लेखनपद्धति आणि भाषाप्रभुत्व, गुणांचें ग्रहण आणि दोषांचें आविष्करण करतांना त्यांनी राखिलेला संयमपूर्ण समतोलपणा अित्यादि विशेषांमुळे त्यांचे हे परीक्षणात्मक लेख अभ्यासकांना अुपयुक्त वाटतील यांत शंका नाही.

श्री. रा. पारसनीस

स्वयंपाकघरांतील भाषेंत बोलावयाचें झालें तर श्री. माडखोलकरांच्या **जीवनसाहित्य** या पुस्तकाच्या प्रकाशनाला अेखाद्या सुगर आणि समयज्ञ स्वयंपाकिणीने घरांत अुरलेलें शिळेपाकें अन्न फोडणीला घालून तें पक्वान्नाच्या प्रौढीने पंक्तींत वाढावयाला आणावें, या प्रकाराची अुपमा देतां येअील. यांतील "कांही लेख जीवनपर (अर्थात् श्री. माडखोलकर यांच्या) आणि कांही साहित्यपर आहेत म्हणून या स्फुट लेखांच्या संग्रहाला जीवनसाहित्य असें नांव मीं दिलें आहे" असें श्री. माडखोलकर निवेदन करतात. १९२३ पासून १९४१ पर्यंतच्या (दोन्हीहि वर्षें धरून) कालखंडांतले निवडक लेख यांत समाविष्ट झाले आहेत. त्यांपैकी 'केळकरांची लेखनशैली' व 'शाहिरी, अैतिहासिक आणि राष्ट्रीय कविता' हे दोन लेख केव्हांहि निरपवाद मान्यता पावतील असे आहेत. अितर लेखांत सजावटीचा शोभिवंतपणा भरपूर असला तरी तात्त्विक सत्याचा सत्त्वांश फार थोडा आढळून येतो.

या संग्रहांतील निबंधांवरून सन १९४१ सालांत श्री. माडखोलकर विशेष 'जीवनपर' झालेले दिसतात, आणि त्यापूर्वी ते फक्त साहित्यतत्परच होते असें अनुमान निघतें. जीवनपर आणि साहित्यपर वृत्तींच्या सीमारेषेवर असलेल्या 'राजकीय कादंबरी' या आपल्या लेखांत ते सांगतात की, "मी गेलीं बावीस वर्षें (ज्या व्याख्यानावरून हा लेख तयार झाला आहे तें दिल्याची तारीख, २७ ऑगस्ट १९४१) वृत्तपत्रव्यवसायांत आहें व मी कादंबऱ्या लिहितों त्याहि वृत्तव्यवसायाची अेक शाखा म्हणूनच लिहितों" (पृ. ५६) स्वाभाविकच त्यांच्या

साहित्यपर लेखांचें स्वरूपहि स्थल-काल-परिस्थिति यांनी निश्चित होत असलें तर त्यांत कांही आश्चर्य नाही. ज्या नियतकालिकासाठी लेख लिहावयाचा त्याचें धोरण, तें नियतकालिक जेथे प्रसिद्ध होतें व वाचलें जातें तेथील वाचकवर्गाच्या व त्या नियतकालिकाच्या चालकवर्गाच्या अभिरुचि व अपेक्षा, आणि ज्या वेळीं तें प्रसिद्ध व्हावयाचें असेल त्या काळीं व त्या स्थळीं विशेष जोरांत प्रचलित असणारी विचारसरणी, यांचा संकलित परिणाम त्यांच्या लेखांतील विचारांवर व विवेचनांवर व्हावा हें स्वाभाविकच आहे. या दृष्टीनें श्री. माडखोलकर अलीकडे मांडीत असलेलीं मतें व मानीत असलेलीं मूल्यें ज्यांना माहीत आहेत, त्यांना त्यांच्या १९२३ ते १९३६ या कालखंडांतील लेखांच्या संग्रहाचें अैतिहासिक महत्त्व व अुपयुक्तता हीं सहज कळतील. मात्र "वृत्तपत्रव्यवसायांत आलेला मानवी स्वभावाचा आणि हालचालींचा दुर्मिळ असा अनुभव" श्री. माडखोलकर यांच्या गांठीला असल्यामुळे तो नसणाऱ्या सामान्य साहित्यिकांप्रमाणे त्यांच्या वाङ्मयविषयक अुपपत्ति किंवा साहित्यविषयक तात्त्विक कल्पना स्थिर आणि सुसंगत असाव्यात अशी अपेक्षा करणें अयोग्य होय.

"वाङ्मय भ्रष्ट होतें तें सामान्यांच्या संसर्गामुळे नव्हे तर असामान्यांच्या मानसिक अवनतीचें प्रतिबिंब त्यांत अुमटतें म्हणून. प्रतिष्ठित लेखक हे जेव्हा आपली जबाबदारी विसरून पैशाच्या किंवा लोकप्रियतेच्या लालसेने लोकांच्या अुत्तान मनोविकारांना अुत्तेजित करील असें वाङ्मय बुद्धिपुरस्सर निर्माण करतात तेव्हा वाङ्मयाचा प्रवाह कलुषित होतो. त्याचें खापर बहुजनसमाजाच्या माथीं फोडणें म्हणजे आत्मवंचना करून घेणें किंबहुना आपलें पाप दुसऱ्याच्या माथीं बसविणें आहे." (पृ. ११२).

असें १९३३ सालीं सात्त्विक आवेशाने, अगदी स्पष्ट शब्दांत सांगणारे श्री. माडखोलकर अेका तपाच्या आंतच आपल्या अेका कादंबरीकन्येची रसिकांकडे बोळवण करतांना तिची पाठराखीण म्हणून आपले मित्र श्री. अुमाकांत भेंडे यांच्या आजची अभिरुचीच अश्लील आहे, अशा प्रकारचा दावा मांडणाऱ्या प्रस्तावनेची योजना करतांना दिसावेत, हा दैवदुर्विलास रसिकांना अुद्वेगजनक व शोचनीय वाटला तरी, आपण आपलें कादंबरीलेखन वृत्तपत्रव्यवसायाची अेक शाखा म्हणून करतों, तो आपला अेक 'जोडधंदा आहे' (पृ. ५६) या श्री. माडखोलकरांच्या मोकळ्या मनाने दिलेल्या कबुलीजबाबाशीं तो मुळींच विसंगत नाही हें कोणीहि कबूल करील.

श्री. माडखोलकर यांच्या असंख्य चाहात्यांना व अपरिमित अल्पपरिचितांना, त्यांचें कौटुंबिक जीवन, त्यांच्या आवडीनिवडी, सवयी यांबद्दल वाटणारें कुतूहल व कौतुक यांचें या संग्रहांतील 'जीवनपर' लेखांनी अंशतः तरी समाधान होअील असा भरवसा वाटतो. श्री. माडखोलकर हे जसे सिद्धहस्त बहुश्रुत लेखक आहेत तसेच ते अेक व्यवहारचतुर गृहस्थ आहेत; याचें प्रत्यंतर या लेखांतून चांगलें पटतें. गुर्जर कादंबरीकार रमणलाल देसाअी यांनी 'आपल्याला गुजराती अुत्तम येतें काय ?' असें श्री. माडखोलकर यांना त्यांचें बडोदा येथील अध्यक्षीय भाषण अैकून विचारलें असतां, त्यावर त्यांनी जें अुत्तर दिलें तें विशेष अुद्बोधक आहे. ते म्हणाले,

"छेः, मुळींच नाही. माझ्या भाषणांतील गुजराती साहित्यासंबंधीची चर्चा मीं माझ्या अेका गुजराती जाणणाऱ्या मित्राच्या (श्री. गिजरे यांच्या) मदतीने केली आहे. पण माझी मुलगी मीना हिचें सर्व शिक्षण सध्या गुजरातींतून चालू आहे व पुढे मागे तिच्या साह्याने मी गुजराती साहित्याचाहि अुत्तम परिचय करून घेअीन". (पृ. २१)

श्री. माडखोलकर यांच्या या चार वाक्यांच्या अुत्तरांतील पूर्वार्धावरून त्यांचें साहित्य आणि अुत्तरार्धावरुन त्यांचें जीवन, यांचें स्वरूप व धोरण याबद्दलचा जो बोध होतो, त्यांच्या साहित्यिक व वैयक्तिक जीवनांतील वैशिष्ट्यांची जी सुस्पष्ट कल्पना येते, ती त्यांच्या अेखाद्या स्नेह्याने लिहिलेल्या चारशे पानांच्या चरित्रावरूनहि येणें शक्य नाही !

**के. ना. काळे**

## साहित्यशास्त्र

**लघुकथा कशा लिहाव्या ?**—ले० श्री. बा. कृ. गलगली; मुद्रक व प्रका० —किर्लोस्कर प्रेस, किर्लोस्करवाडी; किं. ८ आणे; पृष्ठसंख्या ३९

**चरित्र, आत्मचरित्र, टीका**— ले० प्रा. अ. म. जोशी व प्रा. प्र. ब. माचवे; प्रका० सुविचार प्रकाशन मंडळ लि., नागपूर; किंमत १॥ रुपया.

लघुकथेच्या तंत्राची चर्चा या छोटेखानी पुस्तकांतील सहा प्रकरणांत केली आहे. टीकात्मक वाङ्मय हें बहुतांशीं परोपजीवी असतें. अगोदर टीकाविषय होणारें वाङ्मय पुष्कळ प्रमाणांत निर्माण होणें आवश्यक असतें; त्यामध्ये विविधता यावी लागते. आणि असें वाङ्मय निर्माण झालें म्हणजे त्या वाङ्मयप्रकाराची चर्चा साहजिकच सुरू होते— त्याचें अेक विशिष्ट तंत्र बनतें. अलीकडे मराठी वाङ्मयांत लघुकथांची निपज फार मोठ्या प्रमाणावर होअूं लागली आहे. लघुकथांच्या तंत्राची चर्चा स्वतंत्र लेखाच्या रुपाने किंवा लघुकथासंग्रहांना लिहिलेल्या दीर्घ प्रस्तावनांच्या साहाय्याने किंवा 'प्रतिभासाधन'सारख्या वाङ्मयतंत्राचा विचार करणाऱ्या कांही पुस्तकांमधून झालेली आहे. तथापि याच अेका वाङ्मयप्रकाराचा स्वतंत्र पुस्तकांत अूहापोह झालेला नव्हता. तो अलीकडे होअूं लागला आहे आणि अशाच अेका प्रयत्नांपैकी श्री. गलगली यांचा हा प्रयत्न आहे.

लघुकथांच्या तंत्रामध्ये लेखकाला ज्या गोष्टी विशेष महत्त्वाच्या वाटल्या त्यांचें विवेचन या पुस्तकांतील सहा प्रकरणांत सोदाहरण केलें आहे. शब्दांच्यामध्ये भावना निर्माण करण्याचें सामर्थ्य असतें. हा लघुकथेचा, किंबहुना सर्व ललितलेखनाचा, आत्मा आहे. तथापि अेखाद-दुसरी सूक्ष्म किंवा तरल भावना काव्याचा विषय होअूं शकते. लघुकथेमध्ये अशी भावना परिणामकारक होण्यास कोणत्या तरी संग्रामाचें अधिष्ठान जरूर असतें. विरोधाच्या द्वारा असा संग्राम कसा आणितां येतो याची मार्गदर्शक चर्चा पुढील कांही प्रकरणांतून केली आहे. लघुकथांचे सहा प्रमुख प्रकार लेखकाने सांगितले आहेत, आणि शेवटच्या दोन प्रकरणांत लघुकथेचा प्रारंभ आणि शेवट या महत्त्वाच्या घटकांची किंवा कलांगांची चर्चा आली आहे.

तंत्र माहीत असलें म्हणजे अुत्कृष्ट लघुकथा लिहितां येअीलच असें नाही याची जाणीव लेखकाला आहे. काय सांगावयाचें हा अगदी व्यक्तिगत प्रश्न; पण तें परिणामकारक रीतीने कसें सांगतां येअील हें तंत्र सांगतें. तथापि त्या ठिकाणींहि तंत्राचा मर्यादितच अुपयोग आहे. कलाविषयक दृष्टि कलाविषयाचा अभ्यास करूनच लेखकाच्या ठिकाणीं येत असते. लघुकथा-लेखकांना मार्गदर्शन करण्याचें कार्य प्रस्तुत पुस्तकाने चांगलें होअील असा विश्वास वाटतो.

**श्री. रा. पारसनीस**

"या छोटेखानी पुस्तकांत 'चरित्र, आत्मचरित्र व टीका' या तीन वाङ्मयप्रकारांचें तात्त्विक दृष्ट्या विवेचन करण्याचा प्रयत्न केला आहे. 'विद्यार्थ्यांच्या अभ्यासास मदत म्हणून

या निबंधाचा अुपयोग होअील अशी आशा आहे", असें 'निवेदनां'त लेखक सांगतात. तर "वाङ्मयप्रकारांचें तंत्रदृष्ट्या सोपपत्तिक विवेचन करणारे ग्रंथ मराठींत बहुधा नाहींतच. ही अुणीव भरून काढण्यासाठी भिन्न भिन्न वाङ्मयप्रकारांचें सर्वांगपूर्ण व पायाशुद्ध विवेचन करणारे ग्रंथ तज्ज्ञ लेखकांकडून लिहवून घेअून ते प्रसिद्ध करण्याचें आम्हीं योजिलें आहे. प्रस्तुत ग्रंथ या मालेंतील पहिला ग्रंथ म्हणून प्रसिद्ध होत आहे" अशी ग्वाही साहित्य-साधना या शीर्षकाखाली प्रकाशक देतांना आढळतात. पुस्तक वाचून पाहतां प्रकाशकांची प्रतिज्ञा अतिशयोक्तिपूर्ण आहे असें दिसून येतें; व विद्यार्थ्यांच्या अभ्यासाला मदत म्हणून या निबंधाचा अुपयोग होअील हा लेखकांचा विनयपूर्ण निर्वाळाच यथार्थ वाटतो.

**चरित्र** या निबंधांत, 'चरित्र म्हणजे काय', 'चरित्र हा वाङ्मयप्रकार आहे', 'वाङ्मयप्रकारांत कला हवी', 'चरित्र म्हणजे अितिहास नव्हे', 'चरित्रलेखनाचे हेतु', 'चरित्रविषयाची निवड', 'चरित्रांतर्गत सत्यांश', 'चरित्राचीं साधनें', 'चरित्र आणि कादंबरी यांतील साम्य-भेद', 'चरित्रकाराची चरित्रविषयीभूत व्यक्तीबद्दलची वृत्ति', 'चरित्रग्रंथाची मांडणी व तींतील वैशिष्ट्यें'; आणि **आत्मचरित्र** या निबंधांत 'आत्म-चरित्र लिहिण्यांत लेखकाचा हेतु', 'कळत वा न कळत होणारा सत्यापलाप', 'लैंगिक चर्चेच्या मर्यादा' अित्यादि महत्त्वाचे मुद्दे थोडक्यांत पण सोपपत्तिक रीतीने आणि मनोरंजक भाषेंत चर्चिले गेले आहेत. निबंधलेखकाची चरित्राची व्याख्या 'सत्यपूर्ण व कलात्मक व्यक्तिदर्शन' अशी असून, आत्मचरित्राबद्दलची त्याची कल्पना श्री. जैनेंद्रकुमार यांच्या, 'आत्मचरित्र लिहिणें हें अेक प्रकारें आत्मदान वा आपल्या अनुभवांचें समर्पण आहे' या शब्दांत व्यक्त झालेली आहे. लिटन स्ट्राची, आंद्रे मूर्वा व अेमिल लुड्विग् हे लेखकाच्या दृष्टीने आदर्श चरित्रकार होत. यांपैकी पहिल्या दोघांच्या ग्रंथांतील अुतारे ठिकठिकाणीं अुदा-हरणादाखल अुतरून घेतलेले आढळतात. 'चरित्रलेखनास आवश्यक असलेला दृष्टिकोन मराठी चरित्रकारांत अद्याप आला नाही' असें निबंधलेखकाचें मत आहे. यामुळे मराठी चरित्रलेखकांच्या ग्रंथांचा अुपयोग चरित्रवाङ्मयांतील दोषांचीं अुदाहरणें निवडण्यासाठी भरपूर प्रमाणांत जाणूनबुजून करून घेतलेला दिसतो. 'मराठी भाषेंत अुत्कृष्ट चरित्रग्रंथ जवळ जवळ नाहींतच' असें लेखकाला वाटत असलें, तरी 'आत्मचरित्राच्या बाबतींत तसें म्हणतां यावयाचें नाही. १८७१-७२ सालीं लिहिलेल्या दादोबा पांडुरंगांच्या आत्मचरित्रापासून मराठी भाषेंत सातआठ तरी नांव घेण्यासारखीं आत्मचरित्रें लिहिलीं गेलीं आहेत. या सर्व ग्रंथांत प्रामाणिक आत्मपरीक्षण भरपूर दिसून येतें' असें स्पष्ट शब्दांत तो सांगतो.

आदर्श चरित्रवाङ्मयप्रकाराबद्दलच्या या पुस्तकांत प्रकट झालेल्या लेखकाच्या कल्पना खुद्द अिंग्रजी वाङ्मयांत देखील, 'गेल्या २५-३० वर्षांतच आल्या आहेत' आणि 'स्ट्राची प्रभृति चरित्रकारांनी चरित्राची कादंबरी करण्याच्या भरांत सत्याची चाड जितकी बाळगा-वयास पाहिजे होती तितकी बाळगली नाही' असा खराखोटा आक्षेप त्यांच्यावर घेण्यांत येतो; हे लेखकाने आनुषंगिक रीतीने केलेले अुल्लेख ध्यानांत ठेवले आणि या विशिष्ट चरित्र-लेखनपद्धतीबद्दलचा त्याचा प्रेमळ पक्षपात व आपुलकीचा आवेश न विसरण्याचा सावधपणा बाळगला म्हणजे अभ्यासकाला पुष्कळच महत्त्वाचा ग्राह्यांश या निबंधांतील विवेचनांतून निवडतां घेण्यासारखा आहे यांत शंका नाही.

विचार, मांडणी व भाषा या तिन्ही दृष्टींनी हे दोन्ही निबंध वाखाणण्यासारखे झाले आहेत. डॉ. जान्सनला रस्त्याने जातांना तारेचे खांब मोजावयाला लावण्याचा कालविपर्यास

अनुक्रमणिका

(पृ. २८) किंवा धाकटा पिट् याचें लेडी हेस्टर स्टॅनहोप हिच्याशीं चुलत्याचें नातें जोडणें, (पृ. ९३) असले क्वचित् कोठे आढळणारे नजरचुकीचे दोष सहज दुरुस्त करतां येण्यासारखे आहेत. शुद्ध, सुटसुटीत व सफाईदार वाक्यरचना, समर्पक शब्दांची निवड आणि त्यांची चपखल योजना, सुरस व तर्कशुद्ध विवेचनपद्धति या गुणांनी चरित्र व आत्मचरित्र या दोन्ही निबंधांना विशेष शोभा व अुपयुक्तता प्राप्त झालेली असून, वाचकाला कुठेहि न अड-खळतां अेकतानतेने ते वाचतां येतात, हा त्यांचा विशेष गुण होय. प्रा. माचवे यांचा टीका या विषयावरील निबंध वाचीत असतां मात्र अगदी याच्या अुलट अनुभव येतो. समर्पक व सूचक शब्दयोजनेची त्यांना अेकंदर लेखनालाच मोठी अडचण भासते हें त्यांनी आपल्या निबंधाच्या प्रारंभींच विस्ताराने सांगितलें आहे. नवे अनुभव, नव्या कल्पना, नवे आणि अधिकाधिक गुंतागुंतीचे विचार, प्रकट करण्याला नवे शब्द बनविणें किंवा जुन्यांच्या अर्थाचा विकास करणें आवश्यक असतें. ही प्रक्रिया चालू असतां त्याबाबतचे सर्वच प्रयत्न सारखे यशस्वी, सौष्ठवपूर्ण किंवा सुसंबद्ध असणें शक्य नाही. प्रा. माचवे यांचें अेतद्विषयक विवेचन 'शब्द अनित्य असून भाव नित्य आहेत' या शीर्षकाखाली ग्रथित झालें आहे. याशिवाय, 'शब्द आणि विचार यांचा समन्वय', 'कवि हा अुत्कृष्ट टीकाकार असावयास पाहिजे', 'टीकाकार निःपक्षपाती व निर्भय असावा', 'टीकाकाराला आत्मविश्वासपूर्ण मतनैश्चित्य पाहिजे', 'तत्त्वज्ञानाच्या अभ्यासाचा अुपयोग', 'वाङ्मय स्वान्तःसुखाय कीं परसुखाय', 'वाङ्मयनिर्मात्याच्या मनोवृत्तीची चिकित्सा', 'टीकेचे समाजशास्त्रीय निकष', 'विवेचन पद्धतीचे तीन प्रकार', 'कलेचें कार्य शास्त्रीय प्रक्रियेपासून भिन्न' अित्यादि अुपशीर्षकांखाली टीका या वाङ्मयप्रकाराचें शास्त्र व कला या दृष्टीने अुद्बोधक विवरण करण्यांत आलें आहे. शीर्षकांच्या नुसत्या नांवांवरून देखील विवेचनाची व्यापकता सहज लक्षांत येअील. तें वाचतांना लेखकाची स्वतंत्र बुद्धि व वैचारिक ओजस्विता हीं ठिकठिकाणीं प्रतीत होतात. तरी पण अेकंदरींत शास्त्रीय पद्धतीने व समतोल मनाने हें निबंधलेखन झालेलें नाही असें म्हटल्या-वांचून राहवत नाही. भाषेचा सुबोधपणा व विवेचनांतील युक्तिवादाची सुसूत्रता व संगति यांकडेहि यांनी तितकें लक्ष दिलेलें दिसत नाही. वैयक्तिक मतांच्या दर्पाने युक्तिवाद ठिक-ठिकाणीं निष्कारण झाकळलेला दिसतो. पण कदाचित् या दोषांमुळेच वर अुल्लेखलेले मौलि-कता व ओज हे गुण अुठून दिसून येत असणें संभवनीय आहे. अेकंदरींत या निबंधाचें स्वरूप लेखकाने स्वतःसाठी तयार केलेला विस्तृत आराखडा आणि टिपणें यासारखें वाटतें. लेखकाने आपल्या मतांची 'हुंडी' शास्त्रशुद्ध विचार आणि पद्धति यांच्या मंदाग्नीवर 'ठीक रीतीने' पक-विण्याअैवजी, आपल्या युयुत्सु मनाच्या आवडीनिवडींच्या ज्वालांवर ती अुकडत असतांनाच तींतील कदार्थ वाचकाच्या 'थाळीं'त अर्धकच्च्या अवस्थेंतच 'परसण्या'ची घाअी केलेली दिसते.

के. ना. काळे

## कला व शास्त्रें

संगीतकलाप्रवेश—ले० श्री. शं. ल. सप्रे; १९४३; किं. २ रु.

कागद—लेखक श्री. बापूराव शिवराम नाअीक; प्रकाशक चित्रशाळा, पुणें; किं. रु. १॥.

नागपूर येथील श्रीराम संगीत विद्यालयाचे प्रमुख श्री. शं. ल. सप्रे यांनी हें पुस्तक

प्रसिद्ध केलें आहे. श्री. सप्रे यांनी यापूर्वी 'संगीतशास्त्रप्रवेशिका' हें पुस्तक प्रसिद्ध केलें आहे व तें नागपूर हायस्कूल बोर्डानें क्रमिक पुस्तक म्हणून मंजूरहि केलें आहे. शास्त्रप्रवेशिकेनंतर प्रत्यक्ष कलाप्रवेश, व तोहि बऱ्याच विस्तृत प्रमाणावर, व्हावा हें योग्यच आहे. श्री. सप्रे यांचीं आणखी तीन पुस्तकें संगीतशास्त्र व कला या विषयांवर आहेत. पैकी अेक ओवीबद्ध व अेक आर्याबद्ध आहे हें सद्यःकालीन गद्ययुगांत कौतुकास्पदच म्हणावें लागेल. मिळेल त्या गुरूजवळ त्याच्या विशिष्ट मतांप्रमाणे व लहरीनुसार शिकण्याचा काळ पूर्वीच लोपला आहे. परंतु शिक्षणांतील कांहीं भाग असा असतो की तो प्रत्यक्ष गुरुमुखाने शिकणें किंवा गुरु प्रत्यक्ष क्रिया किंवा प्रयोग करीत असतां त्यांचें सूक्ष्म निरीक्षण व श्रवण-मनन करणें भाग असतें. प्रस्तुत पुस्तकाचें अुद्दिष्ट गुरूच्या साहाय्याशिवायहि हा भाग विद्यार्थ्यांच्या आटोक्यांत यावा व त्याला ग्रंथाच्या मदतीनेच अुच संगीतांतील प्रसिद्ध राग, त्यांच्या आलाप व तानांसह शास्त्रशुद्धपणें व तयारीने गातां-वाजवितां यावे असें आहे. प्रचार व मान्यता या दृष्टीने आजकाल प्रिय झालेलीं पुस्तकें व त्यांतील शास्त्रीय चर्चा आणि रूढ असलेल्या गायकींतील खास गवअी मंडळींच्या मख्ख्या यांचा अंतर्भाव पुस्तकांत झाल्याखेरीज त्यास योग्य ती मान्यता मिळणें शक्य नाही हें जाणून श्री. सप्रे यांनी हें पुस्तक सर्वस्वी संकलनात्मक पद्धतीने लिहिलें आहे. शास्त्र पं. भातखंड्यांचें व आलाप-ताना श्री. सप्रे सांगतात त्याप्रमाणे गायनाचार्य बाळकृष्णबुवा, पं. पलुस्कर वगैरेंच्या असा हा मणिकांचनयोग श्री. सप्रे यांनी केला आहे; व तो व्यावहारिकदृष्ट्या ठीक आहे. पण यापेक्षा अधिक खोलवर व शास्त्रीय विचार करणारास हा योग पुष्कळ ठिकाणीं परस्परविरोधी व विसंवादी वाटण्यास अनेक सबळ कारणें आहेत. ती श्री. सप्रे यांना माहीत नसतील असें नाही. पं. भातखंडे यांचें शास्त्र 'लक्ष्यसंगीत' म्हणजे संगीत जसें आज रूढ आहे त्याला पोषक व्हावें असें हेतुपुरस्सर बनविलेलें आहे, असें करतांना अेका ठिकाणीं जुन्या ग्रंथांना त्यांनी त्याज्य म्हटलें आहे, तर जेथे त्याच जुन्या ग्रंथांच्या आधारावर आपल्या नव्या शास्त्राची प्रतिष्ठा वाढणें संभवनीय आहे असें वाटलें तेथे त्यांचे आधारावर आधार दिले आहेत. थाटपद्धतिहि त्यांनी अुत्तरेकडील संगीतात नसतां दाक्षिणात्य संगीतांतून घेतली आहे. पण तीहि संपूर्ण ७२ थाटांची न घेतां आपल्यास दहा थाटच सांपडले, तेव्हा दहापुरतीच बस्स आहे असा अुघड निर्वाळा त्यांनी दिला आहे व येन केन प्रकारेण प्रत्येक रागाला आपल्या दहा थाटांच्या पेटाऱ्यांत खुपसलें आहे. यामुळे परंपरागत गायकींतील अनेक रागांच्या शास्त्रार्थांत व वर्गीकरणांत त्यांना बरीच फिरवाफिरव करावी लागली व अनेक जुन्या राग-रागिण्यांचे सक्तीचे काडीमोड घडवून फिरून पुनर्विवाह करणें भाग पडले. सनातनी पद्धतीच्या व बाळबोध वळणाच्या परंपरागत कलावन्तांनी अर्थातच या गोष्टीस विरोध केला. याच विरोधामुळे गुरुघराण्याचे आलाप व ताना आणि पं. भातखंडे यांच्या शास्त्रांत जो नैसर्गिक विरोध आहे तो श्री. सप्रे याच्या पुस्तकांत येणें अपरिहार्य झालें आहे. तथापि 'थोडक्यांत पुष्कळ' व 'दादावाक्यांचा भरपूर आधार' या दृष्टीने श्री. सप्रे यांचें पुस्तक बहुजनसमाजास व प्राथमिकापेक्षा थोड्या वरच्या दर्जाचें म्हणून अुपयोगी पडेल असें म्हणण्यास प्रत्यवाय नाही.

पुस्तकांत रागमयूर नांवाच्या श्री. सप्रे यांनीच बनविलेल्या पुस्तकांतील रागवर्णनपर आर्या दिल्या आहेत. या आर्या अर्थात्च काव्यमय नाहीत व अभ्यासक आजच्या काळांत पाठ करील असें वाटत नाही. यामुळे तरी यापुढील रचना त्यांनी गद्यांतच करावी हें अिष्ट दिसतें. गुरुपरंपरेंतील आलाप-ताना देतांनाहि राग कोणताहि असो आलाप-तानांचा अेक

विशिष्ट क्रम म्हणून आहे तो प्रथम विस्तारपूर्वक देणें अिष्ट होतें. हा क्रम विद्यार्थ्यास अेकवार समजला म्हणजे प्रत्येक रागाच्या विशिष्ट अुपजा, ताना समजण्यास व लक्षांत ठेवण्यास सोपें पडतें. श्री. सप्रे यांनी हा क्रम सर्वच ठिकाणीं अमाचितपणें अनुसरलेला असला तरी तो पूर्णांशाने अनुसरलेला नाही. विस्तारक्रमांत चढत्या, अुतरत्या, ठरत्या व फिरत्या अशा अनेक प्रकारच्या अुपजा व ताना असतात, व प्रत्येक विस्तारांत रागांग टेवून निरनिराळे मुकाम कायम करण्यांत येतात. या क्षेत्रांत श्री. सप्रे यांचा विस्तार गणितसिद्ध वळणावरच गेला आहे हें त्यांतील रागांगाच्या अभावावरून दिसून येत आहे. गुरुपरंपरेच्या गायकींत आकाराबरोबरच आ, अी, अू, घुमारायुक्त व चिजेच्या अक्षरांच्या बोलांतच बोल-आलाप व बोल-ताना करण्याचा महत्त्वाचा माग आहे व तो या ग्रंथांत अजिबातच वगळला गेला आहे. तरी तो कांही चिजांच्या आधाराने का होअीना लिहिणें योग्य झालें असतें. सर्वांत महत्त्वाची गोष्ट म्हणजे संकलनकाराने दुसऱ्याचें किती घ्यावें व आपलें किती असावें हा प्रश्न काळजीपूर्वक सोडविला पाहिजे. सर्वच लोकांचें घेतल्यावर लोकांचे ग्रंथ आहेतच, मग हे नवे कशाला, असा आक्षेप येण्याचा संभव असतो. प्रस्तुत पुस्तक पं. मातखंडे यांच्या पुस्तकांची अधिकृत असो वा अनधिकृत असो धांवती आवृत्तिच आहे हें अुघड दिसण्याअितका मातखंडे यांच्या पुस्तकांतील मजकूर यांत आला आहे. तरी श्री. सप्रे यांनी स्वतःची अशी कांही रचना असेल तेवढीच स्वतंत्रपणें जनतेपुढे मांडावी व त्यांतच परिश्रम करून आपल्या व्यासंगास तेज आणावें अशी सूचना करणें अस्थानीं होणार नाही असें वाटतें.

ग. ह. रानडे

आपल्याकडे शास्त्रीय विषयांवर पुस्तकें आधीच फार थोडीं व त्यांतहि अुपयुक्त अशीं अधिकच दुर्मिळ अशी स्थिति आहे. त्यातून ज्यांना अेखाद्या शास्त्रीय विषयाचा अभ्यास करावयाचा असतो ते देशी मापांतील पुस्तकांवर न विसंबतां मूळ अिंग्रजी ग्रंथांचाच आश्रय स्वाभाविकपणें घेतात. त्यामुळे चांगल्या पुस्तकांच्या अुपयुक्ततेचें व खपाचें क्षेत्र अधिकच मर्यादित होतें. ज्यांना अिंग्रजी फारसें समजत नाही किंवा ज्यांची शास्त्रीय ज्ञानाची जिज्ञासा बेताचीच आहे अशा लोकांपुरतेंच देशी भाषेंतील शास्त्रीय विषयांवरील ग्रंथांचें महत्त्व आज तरी आहे; व म्हणून शास्त्रीय ग्रंथांची निर्मिति मर्यादित होते व खप तर त्याहूनहि मर्यादित असतो. अशाहि परिस्थितींत श्री. बापूराव नाअीक यांनी चिकाटीने व अभ्यासपूर्वक 'कागद' या विषयावर ग्रंथ लिहिला व तो चित्रशाळेने प्रसिद्ध केला त्याबद्दल त्यांचें अभिनंदन केलें पाहिजे.

या ग्रंथांत कागदाची बरीच तपशीलवार माहिती दिली आहे. पूर्वी कागद कसा तयार करीत, तो बनविण्याच्या पद्धतींत कालानुसार कसकशा सुधारणा होत गेल्या, हल्ली तो कसा व किती विविध प्रकारचा करतात, अित्यादिसंबंधी चिकित्सक पद्धतीने व तपशीलवार माहिती दिली असून जागोजाग चित्रें घातल्याने पुस्तक फार अुपयुक्त व आकर्षक झालें आहे.

कागदाचे प्रकार विविध झाल्यामुळे कोणत्या कामासाठी कोणत्या प्रकारचा कागद वापरावा हा प्रश्न आपोआपच निर्माण होतो; किंबहुना गरजेच्या प्रमाणानुसारच कागदाचे प्रकार अितके विविध झाले आहेत. म्हणून लिहिण्याचा, छापण्याचा, टिकाअू व वर्तमानपत्रासाठी लागणारा कागद वेगवेगळा असतो. त्याचें वजन, जाडी, रंग, गुळगुळीतपणा, फुटीरपणा, टिकाअूपणा, चिवटपणा अित्यादि विविध गुणभेदानुसार त्यांचा कोठे व कशाकरिता अुपयोग करावा हें ठरत असतें. यासंबंधीची सर्व माहिती या पुस्तकांत थोडक्यांत व

सोप्या भाषेंत दिली आहे. तसेंच त्याच्या वापराच्या कामीं जर कांही अडचणी आल्या तर त्यांचा परिहार कसा करावा याचेंहि विवेचन त्यांत केलेलें आहे.

हल्ली कागदाचें अत्यंत दुर्भिक्ष आहे. आपल्या देशांत कागदाचा खप अितर देशांच्या मानाने प्रमाणतः फारच कमी आहे. तथापि शिक्षणाचा प्रसार ज्या प्रमाणांत वाढेल त्या प्रमाणांत कागदाचा खप वाढत जाणार हें निश्चित आहे. अशा स्थितींत आपण कोणत्या कामाकरितां कोणता कागद वापरावा याची माहिती सामान्य वाचकालाहि असणें अवश्य आहे. त्यांना हें पुस्तक खात्रीने अुद्बोधक व अुपयुक्त वाटेल. त्याचप्रमाणे लेखनाचा, मुद्रणाचा व प्रकाशनाचा व्यवसाय करणाऱ्यांना तर या पुस्तकाचा अनेक दृष्टींनी अुपयोग होण्यासारखा आहे. असें अुपयुक्त पुस्तक लिहिल्याबद्दल श्री. नाशीक यांचें मी पुन्हा अेकवार अभिनंदन करतों.

शं. रा. दाते

## बालवाङ्मय

**बालविज्ञानसंयोग** भाग १, २, ३— लेखक श्री. दत्तात्रेय व्यंकटेश पै, मडगांव (गोवें); मूल्य अनुक्रमें आ. ८, १२, व रु. १.

प्राथमिक शाळेंतील अभ्यासक्रमांत दिवसेंदिवस डोळ्यांत भरण्याजोगी सुधारणा होत चालली आहे. वीस वर्षांपूर्वीचा अभ्यासक्रम नुसता अशास्त्रीयच होता असे नव्हे तर अनुपयुक्ततेमुळे बराच हास्यास्पद झाला होता. लहान वयांतच मुलांची जिज्ञासा प्रबलतर असते व अशा वेळीं त्यांच्या तोंडून निघणाऱ्या 'हें काय?', 'तें काय?' या कुतूहलप्रश्नांस योग्य अुत्तरें मिळालीं पाहिजेत. श्री. पै यांनी प्रस्तुत मालेंत बालमनासमोर अुत्पन्न होणाऱ्या अनेक प्रश्नांस सोप्या भाषेंत व शास्त्रीय रीतीने अुत्तरं देण्याचा प्रयत्न केला आहे व त्यांत त्यांना बरेंच यश मिळेल असें वाटतें. बालांसाठी लिहिलेल्या पुस्तकांचें यशोमापन प्रत्यक्ष वर्गांत तीं पुस्तकें शिकवून किंवा मुलांना तीं वाचावयास सांगून करावयाचें असतें.

तिन्ही पुस्तकांत मिळून लेखकाने अनेक शास्त्रान्तर्गत प्रश्न चर्चिले आहेत. मानवी प्राण्याला ज्या ज्या गोष्टी दररोजच्या व्यवहारांत गोचर होतात त्यांची शास्त्रीय माहिती या 'मालें'त पुष्कळच आली आहे. भूगोल, खगोल, वनस्पति, प्राणी, शरीरशास्त्र, आरोग्यशास्त्र अित्यादि विविध विषयांचें संमेलन या पुस्तकांत वाचकांस दिसेल. लेखक म्हणतात, प्रत्येक पुस्तक म्हणजे शास्त्रीय विषयांचें अेकाच चोपड्यांत केलेलें केवळ संकलन नव्हे, तर त्या सर्व विषयांचा सहज अुत्पन्न होणाऱ्या अनुक्रमाला धरून केलेला अपूर्व संयोग आहे. या विधानांतील संकलनाबद्दल आमचा आक्षेप नाही परंतु केलेल्या संयोगाच्या मागे जो 'अपूर्व' शब्द आला आहे तेवढा वगळतां आला असता तर बरें झालें असतें. कारण कित्येक ठिकाणीं केलेला संयोग हा 'सहज' नसून कृत्रिम ओढून ताणून केला आहे असें निश्चित वाटतें; व याचें ठळक अुदाहरण म्हणजे ३ ऱ्या भागांत २४ पानावर 'त्रिकोणा'ची सुरवात करतांना लेखकाला स्वसमर्थनासाठी निराळी टीप द्यावी लागली हें होय. याशिवाय आकारावरून अेकदम अुष्णतेकडे जाण्याचा जो प्रयत्न केला आहे तो व अितर कांही ठिकाणचे प्रयत्न तितकेसे सहज आहेत असें वाटत नाही. असा 'सहज' क्रम ठेवणें दुरापास्त आहे हें आम्ही आमच्या अनु-

भवाने सांगतों व लेखकाला तो साधतां आला नाही तर त्यांत कांही चुकलें असेंहि नाही परंतु हा कृत्रिम आग्रह तरी कां धरावा?

याव्यतिरिक्त कांही ठिकाणीं किरकोळ दोष राहिले आहेत. अुदा० भाग १ मधील ८ पानावरील सकाळ व संध्याकाळ यांच्या व्याख्या, १४ पानावर मिश्र रेषेचें अुदाहरणच नाही, वगैरे.

लेखकाची भाषा सोपी व मुलांना समजणारी असल्यामुळे आणि कथनपद्धतीच्या अवलंबाने प्रस्तुत 'माला' प्राथमिक शाळेतील मुलांना व शिक्षकांना अुपयुक्त होअील.

**घा. दा. गोखले**

---

## मध्यहिंदुस्थान-साहित्यवार्ता

प्रतिभामंडळ या तरुणांच्या साहित्यसंस्थेतर्फे 'मुखवटे' व 'क्रौंचवध' या कादंबऱ्यांवर चर्चा झाली. स्थानिक कवींचा अेक काव्यगायनसमारंभहि त्या संस्थेने घडवून आणला. मुंबअीस झालेल्या पुरोगामी साहित्यपरिषदेची फलश्रुतिहि अेका स्वतंत्र सभेत सांगण्यांत आली. नागपूरचे प्रा. भवानीशंकर पंडित यांचें 'मराठी कविता' या विषयावर साहित्यसभेच्या विद्यमानें व्याख्यान झालें. साहित्यसभेच्या वार्षिक सभेत (१४ जून) श्री. सरदार मा. वि. किबे हे अध्यक्ष व रा. वि. ह. आपटे व रा. श्री. गो. मुनशी हे चिटणीस निवडून आले. परिषदेच्या प्राज्ञ व विशारद परीक्षांसाठी साहित्यसभा १ ऑगस्टपासून विद्वान् मंडळींच्या साहाय्याने वर्ग चालू करणार आहे. अभ्यस्त विद्वानांची पाक्षिक व्याख्यानमालाहि सभेतर्फे सुरू होणार आहे.

'पंतवैद्य पारितोषिका'ची योजना मान्य झाली असून हें १०० रु. चें पारितोषिक यंदा नाटकास दिलें जाणार असल्याचें कळतें. 'सरवटे पारितोषिका'ची योजना लवकरच मूर्तस्वरूप धारण करील असें दिसतें.

देवास (धाकटी पाती) येथे दरवर्षाप्रमाणे वसंतव्याख्यानमाला गुंफण्यांत आली. स्थानिक अेतत्प्रांतीय विद्वानांचीं व्याख्यानें, काव्यगायनें व चर्चा झाल्या. श्रीमंत खासेसाहेब महाराज व्याख्यानमालेच्या कार्यांत विशेष आपुलकीने लक्ष घालतात.

**म. अ. करंदीकर**

## गोवें साहित्यवार्ता

चालू तिमाहींत श्री. बा. भ. बोरकर कवि यांची 'अंधारांतील वाट' ही स्वतंत्र सामाजिक कादंबरी प्रसिद्ध झाली. "कामक्षुधा सर्वांनाच पीडा करते व सारे तिचें शमन करीत असतात. कामक्षुधाशांतीवर समाजाचें मलतेंच दडपण असल्याने तिचा आविष्कार प्रसंगीं अत्यंत हीन रूपाने व प्रसंगी बाह्यतः अुच्च दिसणाऱ्या रूपाने होतो" असें ग्रंथकर्त्यास दाखवावयाचें आहे असें वाटतें. परंतु बाह्यतः अुच्च दिसणारीं कार्यें देखील आंतून कामप्रेरितच असतात असें ग्रंथकारास म्हणावयाचें आहे अशाच धर्तीची तिची अेकंदर रचना झाली आहे. दुसरी साहित्यकृति म्हणजे रा. द. व्यं. पै यांची बालविज्ञानसंयोगमाला. (परीक्षण दुसरीकडे देण्यांत आलें आहे.) विद्यार्थ्यांना आकलन होतील अशा मानाने व अेका विशिष्ट पद्धतीने यांतून विविध शास्त्रांवरील धडे यांची निवड व मांडणी केली आहे.

गोमांतकांतील लिसेव सेंत्राल या दुय्यम शिक्षणाच्या विद्यालयांत संस्कृत व मराठी भाषा यांची संयुक्त खुर्ची असते. या भाषा शिकल्याच पाहिजेत अशी विद्यार्थ्यांवर सक्ती नसल्याने.विद्यार्थी फारसे नसतात. तथापि ही खुर्ची अेक अभिमानाचा व आत्मीयतेचा विषय असल्याने तशीच कायम राहावी असें गोमांतकीय महाराष्ट्र भाषाभक्तांस नेहमी वाटत असतें. तथापि ही खुर्ची काढून टाकून तीअैवजी कोंकणी सुरू करण्याचे प्रयत्न चालू आहेत असें समजतें. या वार्तेस सबळ दुजोरा अुपलब्ध नाही.

द. व्यं. पै

---

## गेल्या तिमाहींमधील भाषाभगिनींचा संसार

### हिंदी—

गेल्या तिमाहींत बरींच पुस्तकें प्रसिद्ध झालीं आहेत. त्यांतील महत्त्वाचीं पुढे दिलीं आहेत.

प्रेमचंद—अुनकी कृतियाँ और कला (संपा० प्रेमनारायण टंडन) प्रेमचंदांच्या विविध वाङ्मयाचें परीक्षण श्री. कालिदास कपूर, डॉ. रामविलास शर्मा, श्री. पराडकर आदि लेख-कांनी यांत केलें आहे. नंददास या प्राचीन कवीचें चरित्र व त्याचें सर्व काव्य यांचा संग्रह प्रयाग विश्वविद्यालयाने प्रकाशित केला आहे. बुद्धचरित (अश्वघोष काव्याचा अनुवाद), विक्रमा-दित्य, साहित्यिकोंका स्मरण हीं पुस्तकेंहि अुल्लेखनीय आहेत. क्षत्रियवंशदिग्दर्शन (ले. डॉ. मुरलीधरसिंह आरा) या पुस्तकांत हिंदुस्तानांतील क्षत्रिय हे देशी वंशाचेच आहेत, विदेशी नाहीत, या मताचें विवेचन केलें आहे.

लघुकथा—सड़कपर (ले. पहाडी) यांतील कथा कला व विचार या दृष्टीने चांगल्या आहेत. विद्रोही (संपा० पं. मोहनशर्मा) हा मध्यप्रान्तांतील कथालेखकांच्या कृतींचा संग्रह आहे.

काव्य—कवि श्री. मैथिलीशरण गुप्त यांचीं (१) कुणालगीत, (२) अर्जन और विसर्जन, व (३) काबा और कर्बला हीं पुस्तकें प्रसिद्ध झालीं आहेत. तिसऱ्या पुस्तकांत महमद पैगंबराच्या संदेशाची महती गायिली आहे. खांडवदहन (ले. हिम्मतलाल जोशी), काव्यसुधा-मल्लिका अित्यादि संग्रह लहान मुलांसाठी अुपयुक्त आहेत.

पं. राहुल सांकृत्यायन या प्रसिद्ध पंडिताचीं वैज्ञानिक भौतिकवाद (मार्क्सवादावर आधारलेलें) व मानवसमाज हीं महत्त्वाचीं पुस्तकें या अवधींत प्रसिद्ध झालीं. मानवसमाजाच्या विविध संस्कृति, भाषा, आर्थिक स्थिति यांचें वर्णन दुसऱ्या पुस्तकांत आहे. विमानशास्त्र (ले. प्रियरत्न आर्य) व माताका संदेश हीं नवीन धर्तीचीं पुस्तकें आहेत. 'भारतीय अर्थशास्त्र' व 'साम्राज्य और अुनका पतन' हे श्री. भगवानदास केला यांचे ग्रंथ हिंदींत महत्त्वाचे मानले जातील.

हंस मासिकाचा प्रगति अंक (पुरोगामी अंक)—प्रगतिशील साहित्य म्हणजे काय, हिंदीमध्ये असें साहित्य किती आहे याची विस्तृत चर्चा यांत आली आहे.

जयन्तीस्मारक ग्रंथ—श्री. रामलोचन शरण या प्रसिद्ध पुस्तकप्रकाशकांच्या स्वर्णजयंती-निमित्त त्यांचें चरित्र व अनेक लेखकांचे अितर विषयांवरील लेखांचा हा प्रचंड ग्रंथ आहे.

अखिल भारतीय हिंदी साहित्य संमेलनाचें ३१ वें अधिवेशन हरद्वार येथे मे महिन्यांत दि. १७–१९ या दिवशीं साजरें झालें. खांडव्याचे श्री. माखनलाल चतुर्वेदी हे अध्यक्ष होते.

राष्ट्रभाषापरिषदेचे अध्यक्ष नागरीप्रचारिणी सभेचे कार्यकर्ते श्री. चंद्रबलि पांडे हे होते. दोघांचीं भाषणें चांगलीं झालीं. गरीब साहित्यिकांस मदत देऊन त्यांचीं पुस्तकें प्रकाशित करण्यासाठी अेक निधि जमा करणें, भिन्न भिन्न प्रांतांतील भाषा, ग्रामगीतें, संस्कृति, साहित्य यांची माहिती प्रकाशित करण्यासाठी समिति नेमणें, रेडिओविभागाच्या अुर्दू प्रवृत्तीचा निषेध अित्यादि ठराव पास झाले. राष्ट्रभाषाप्रचारासाठी अेक लाख रुपये जमविण्यास रा. भा. प्रचारसमितीस अनुज्ञाप्ति दिली.

शं. दा. चितळे

## गुजराती—

**कादंबरी**—वारसदार—नारायणचंद्र भट्टाचार्य या सुविख्यात बंगाली कादंबरीकाराच्या सुरस कादंबरीचें भाषान्तर श्री. मृदुल यांनी केलें आहे. मायेचा पूत या नाटकासारखें प्रस्तुत कादंबरीचें कथानक कांहीं अंशीं आहे. जिगर अने अमी (ले. चु. व. शाह) ही कादंबरी वास्तवदर्शी असून सरस आहे. आम्रपाली (रा. ठाकूर) ही बुद्धकालीन पार्श्वभूमीवर रचलेली कादंबरी आहे.

**लघुकथा**—जीवननां वमळ (ले. गट्टुलाल गो. ध्रु) अहमदाबाद येथील महिपतराम रूपराम अनाथाश्रमांतील असहाय स्त्रियांच्या करुण पूर्वेतिहासावर आधारलेल्या या सत्यकथा अत्यंत हृदयस्पर्शी आहेत.

**नाटक**— दुर्गाराम महेताजी अने बीजां नाटको (ले. शारदाप्रसाद वर्मा) लघुनाटकांचा हा संग्रह बऱ्यापैकी आहे.

**अैतिहासिक**— गुजरातना अैतिहासिक लेखो (संग्राहक—गिरिजाशंकर वल्लभजी) या ग्रंथांत प्राचीन काळापासून वाघेला वंशाच्या काळापर्यंतचा अैतिहासिक दृष्ट्या महत्त्वाच्या अशा संस्कृत लेखांचा भाषान्तरासहित संग्रह करण्यांत आला आहे. भाषान्तरांत बऱ्याच चुका झाल्या आहेत. सम्राट् प्रियदर्शी (ले. डॉ. त्रिभुवनदास शाह) जैन सम्राट् संप्रति म्हणजेच सम्राट् अशोक होय अशा स्वरूपाची अत्यंत वादग्रस्त व बरीचशी निराधार अशी चर्चा या ग्रंथांत आली आहे. ध्वजमिलाप (ले. झवेरचंद मेघाणी) लाल चीन व पांढरा चीन या दोन पक्षांच्या ध्वजांचें अेकीकरण कसें झालें त्याची हकीकत यांत आहे.

**विविध**— बापुनां पारणां—म. गांधींच्या गेल्या अुपवासविषयी मेघाणी व काग यांच्या तेवीस गीतांचा संग्रह.

सृष्टीनुं ज्ञान (ले. दयाराम भट्ट) अध्यात्मविषयक संवादरूपाची चर्चा.

लग्नसाधना (ले. सोपान) विवाहसंस्थेविषयी सर्व प्रकारची साधकबाधक चर्चा—सुखी संसाराचें रहस्यकथन.

वि. पां. दांडेकर

## कानडी—

२४ जुलै रोजीं गुलबर्ग्यास कन्नड-साहित्य-परिषदेच्या कार्यकारी मंडळाची बैठक झाली. २३–२५ जुलै हे तीन दिवस अेक वाङ्मयसंमेलनच झालें. मा. वेंकटेश आयंगार (परिषदेचे अुपाध्यक्ष), प्रि. गोकाक व अितर मंडळी यांनीं व्याख्यानें व काव्यगायनवाचन झालें.

म. सा. प. (२६-३-७)

ग्रंथप्रकाशनास मंदीच आहे. मनोहरग्रंथमालेने सुप्रसिद्ध कादंबरीकार श्री. कारन्त यांची 'बेट्टद जीव' ही मंगलोर-कर्नाटककडील डोंगरी जीवनाविषयी लिहिलेली कादंबरी प्रसिद्ध झाली आहे. त्यांतील चित्र अत्यंत सुंदर व यथार्थ अुतरलें आहे. धारवाडच्या सरस्वती भांडागाराने दोन-तीन पुस्तकें लहानमोठ्यांस अुपयुक्त अशीं प्रसिद्ध केलीं आहेत. गोकर्णचे गौरीश कैंकिणी यांचें 'बाळिन गुट्टु' (जीवनरहस्य) हें पुस्तक अुल्लेखनीय आहे. अॅड्लरच्या या धर्तीच्या पुस्तकाप्रमाणे सद्विचार व ज्ञान यांचा हा सुंदर संग्रह आहे. विजापुरास श्री. हळकट्टी यांचा जन्मोत्सव साजरा झाला. देवांनी जसें रामदासवाङ्मयाचें कार्य केलें तसेंच कार्य हळकट्टी यांनी वचन-वाङ्मयासंबंधी केलें आहे. जयकर्नाटक हें मासिक लिंगराज कॉलेजचे श्री. बसवनाळ यांच्याकडे गेलें आहे.

र. श्री. मुगळी

---

# गेल्या तिमाहीमधील मराठीचा साहित्यसंसार

## (मे, जून, जुलै १९४३)

**१ साहित्यविषयक तात्त्विक चर्चाः—**

(१) अितिहास व ललितवाङ्मय— ले. न. चिं. केळकर, सह्याद्रि, जुलै
(२) पुरोगामी साहित्यिकाची भूमिका— ले. ग. द. गद्रे, किर्लोस्कर, मे
(३) काव्यगायन— ले. वा. गो. मायदेव, मनोहर, जुलै
(४) ललितवाङ्मयाची श्रेष्ठता— ले. ह. श्री. शेणोलीकर, ध्रुव, जुलै

**२ ग्रंथपरीक्षणें व अितर लेखः—**

(१) कलेचीं क्षितिजें— ले. द. के. केळकर, धनुर्धारी, १०-१७ जुलै
(२) कवि कुसुमाग्रज— ले. प्र. पाध्ये, धनुर्धारी, जुलै
(३) सावरकरांचें नाट्यवाङ्मय— ले. गोपीनाथ तळवलकर, सह्याद्रि, जून
(४) सावरकरांची कविता— ले. र. वि. हेरवाडकर, सह्याद्रि, जून
(५) महाराष्ट्रांतील दर्यावर्दी जीवन— ले. ना. मा. सन्त, ध्रुव, जुलै
(६) रसविमर्शाचा परामर्श— ले. चिं. ब. पळनिटकर, ध्रुव, मे
(७) मराठींतील नवी स्वरलिपि— ले. वा. न. गोस्वामी, सह्याद्रि, मे
(८) अत्रिमुनीकृत शूद्रकसंहार— ले. रससेवक, यशवंत, जून

**३ साहित्यिकांचा परिचयः—**

(१) प्रा. वा. गो. मायदेव— ले. भ. श्री. पंडित, मनोहर, जुलै
(२) प्रा. वा. म. जोशी—महाराष्ट्राचा महान् तत्त्वसंशोधक— ले. पाध्ये, धनुर्धारी, जुलै

**४ अुल्लेखनीय ग्रंथप्रकाशनः—**

(१) सौंदर्यशोध आणि आनंदबोध— ले. रा. श्री. जोग (तात्त्विक चर्चा)
(२) सावरकरांची कविता— संपा. वा. गो. मायदेव (काव्यसंग्रह)
(३) सावरकर-काव्य-समालोचन— संपा. वा. गो. मायदेव (टीकालेखसंग्रह)

(४) सुवर्णमहोत्सवग्रंथ-सत्कार्योत्तेजक सभा— संपा. ग. शं. देव (लेखसंग्रह)
(५) चंदनवाडी— ले. ग. त्र्यं. माडखोलकर (कादंबरी)
(६) 'परामर्श' आणि 'जीवनसाहित्य'— ले. ग. त्र्यं. माडखोलकर (परीक्षणसंग्रह)
(७) निर्वासित चिनी मुलास— ले. अनिल (काव्य)

५ साहित्यिकांचे मृत्यु:—
(१) प्रा. वा. म. जोशी; २० जुलै, मुंबअी येथे
(रागिणी, आश्रमहरिणी, नलिनी, सुशीलेचा देव, अिंदु काळे व सरला भोळे, विस्तवाशीं खेळ, विचारविलास, विचारसौंदर्य, नीतिशास्त्रप्रवेश अित्यादि ग्रंथांचे लेखक).

---

# महाराष्ट्र-साहित्य-परिषद

## नियामक मंडळाची सभा

म. सा. परिषदेच्या नियामक मंडळाची सभा ता. १ जून १९४३ मंगळवारीं सायंकाळीं ४॥ वाजतां माधवराव पटवर्धन साहित्य मंदिरांत परिषदेचे अध्यक्ष प्रि. वा. म. जोशी यांच्या अध्यक्षतेखाली भरली होती. सभेस खालील सभासद अुपस्थित होते:—

१ वा. म. जोशी, २ द. चा. पोतदार, ३ वा. शि. नाशीक, ४ शं. दा. पेंडसे, ५ म. रा. पाळंदे, ६ अ. म. जोशी, ७ रा. श्री. जोग, ८ श्री. रा. पारसनीस, ९ कृ. ग. लिमये, १० गं. भा. निरंतर, ११ दे. द. वाडेकर, १२ के. नारायण काळे, १३ वा. दा. गोखले, १४ ध. रा. गाडगीळ.

(१) ता. ३० ऑक्टोबर १९४२ व ता. १ नोव्हेंबर १९४२ या दिवशीं भरलेल्या नियामक मंडळाच्या सभांचे वृत्तान्त वाचून पक्के करण्यांत आले.

(२) खालील दुखवट्याचा ठराव सभेने संमत केला:—

"१ रा.ब. दामोदर गणेश पाध्ये, मुंबअी; २ प्रा. नीलकंठ बळवंत मवाळकर, नागपूर; ३ श्री. अण्णासाहेब पावगी, पुणें, ४ प्रा. श्रीकृष्ण नीळकंठ चापेकर, पुणें; ५ डॉ. विष्णु सीताराम सुकथनकर, पुणें; ६ श्री. विष्णु हरि औंधकर; ७ श्री. अप्पाशास्त्री राशिवडेकर(?), मुंबअी; ८ डॉ. नरहर गोपाळ सरदेसाअी, पुणें; ९ रा. ब. वासुदेव अनंत बववेंकर, मुंबअी; १० श्री. विष्णु पांडुरंग नेने, बडोदें; ११ श्री. यादव माधव काळे, बुलढाणा; १२ श्री. यशवंत नारायण टिपणीस, मुंबअी; १३ श्री. मोरेश्वर सखाराम मोने, पुणें; १४ मुं. द. दत्तात्रेय भिकाजी रानडे, अिंदूर; १५ डॉ. लक्ष्मणराव जानराव कोकर्डेकर, नागपूर; १६ रामकृष्णबुवा वझे, पुणें; १७ म. म. माधवशास्त्री भंडारी, अित्यादि साहित्यसेवक व साहित्यसेवकांच्या निधनामुळे म. सा. परिषदेच्या या सभेस अत्यंत दुःख होत आहे."

(३) म. सा. परिषदेचें १९४२ चें अितिवृत्त व हिशेब सभेपुढे मंजुरीसाठी मांडण्यांत आलीं, अितिवृत्त व हिशेब सर्व सभासदांकडे पूर्वीच पाठविलीं असल्याने अितिवृत्ताचें पुनर्वाचन

सभेंत होऊं नये असें ठरलें. प्रा. वाडेकर यांनी कांही शंका विचारल्या त्याबद्दल प्रि. गाडगीळ यांनी खुलासा केला. हिशोबाबद्दल प्रा. पोतदार यांनी कांही सूचना केल्या. परिषदेचा सामान्य निधि, अिमारतनिधि वगैरे बाबी सभासदांस स्पष्टपणें कळाव्यात यासाठी हिशोबाच्या मांडणींत जास्त विस्तार असावा अशी त्यांची सूचना होती. चर्चेनंतर खालील ठराव सर्वानुमते संमत झाला:—

"निधिधारकांकडील निधीच्या व्यवस्थेसंबंधी स्पष्ट नियम लवकर करावेत व निधीच्या देववेवीचे नियम स्पष्ट करावेत."

सामानावरील घसाऱ्यासंबंधी हिशेबतपासनिसांच्या शेऱ्याचा विचार करतां अिमारतीचें कर्ज फिटल्यानंतर या सूचनेची अम्मलबजावणी करण्यांत यावी असें ठरलें.

यानंतर १९४२ सालांत खालील बाबींत अधिक झालेल्या खर्चास सभेने मंजुरी दिली:—

पत्रिका— रु. ३१८-५-९, परीक्षा— रु. ३८-३-०, किरकोळ— रु. १७-४-६, संमेलन ठराव अम्मलबजावणी— रु. ९-७-०, निवडणूक— रु. १०-१०-६, द. सं. शाखा सभा देणगी— रु. २१, माधवराव पटवर्धन साहित्य मंदिर अुद्घाटन— रु. १५०-२-३.

(४) यानंतर १९४३ साठी तयार केलेल्या अंदाजपत्रकाचा विचार सुरू झाला. प्रा. पोतदारांनी कांही शंका विचारल्या. प्रि. गाडगीळ यांनी माहिती दिल्यानंतर हें अंदाजपत्रक सभेने मान्य केलें.

(५) नाशिक संमेलनाने संमत केलेल्या ठरावांच्या अंमलबजावणीचें काम कार्यालयाकडून होत असल्याची माहिती चिटणीसांनी सभेस तोंडी सांगितली.

(६) म. सा. संमेलनाची दप्तरें परिषदेने संग्रहार्थ आपणांकडे ठेवावींत ह्या आशयाची प्रा. पोतदारांची लेखी सूचना विचारांत घेण्यांत आली. तसेंच परिषदेने ज्या अुपसमित्या नेमल्या असतील त्यांचीं दप्तरें त्या त्या चिटणीसांकडून मागवून घेअून तींहि संग्रहीं बाळगतां आल्यास त्यांचा अुपयोग अवश्य होअील व तसा प्रयत्न कार्यालयांकडून व्हावा अशी सूचना कार्यकारी मंडळास त्यांनी केली. ह्या सूचना चिटणीसांनी मान्य केल्या व तसा प्रयत्न कार्यालयाकडून केला जाअील असें कार्यकारी मंडळातर्फे आश्वासन दिलें. यानंतर कार्याध्यक्ष रा. सा. र. लु. जोशी यांचा राजिनामा परिषदेकडे आल्याबद्दलची माहिती व त्यांनी आपला राजीनामा परत घ्यावा याबद्दलचें विनंतिपत्र आपण त्यांस पाठविलें असल्याचें अध्यक्षांनी सांगितलें व त्याबाबत त्यांचें अुत्तर आल्यानंतर या प्रश्नाबद्दलचा पुढील विचार करतां येअील असा खुलासा त्यांनी केला व सभा विसर्जन करण्यांत आली.

## वार्षिक साधारण सभा

म. सा. परिषदेची वार्षिक साधारण सभा ता. १ जून १९४३ दिवशीं सायंकाळीं ५॥ वाजतां म. सा. परिषदेच्या 'माधवराव पटवर्धन साहित्य मंदिरां'त परिषदेचे अध्यक्ष प्रि. वामन मल्हार जोशी यांच्या अध्यक्षतेखाली भरली होती.

सभेस खालील सभासद अुपस्थित होते:—

१ वा. म. जोशी, २ के. ना काळे, ३ कृ. भा. बाबर, ४ श्री. रा. पारसनीस, ५ ग. गं. जांभेकर, ६ नी. शं. नवरे, ७ चिं. वि. जोशी, ८ म. गो. मोडक, ९ शं. दा. पेंडसे, १० ध. रा. गाडगीळ, ११ द. वा. पोतदार, १२ बा. शि. नाअीक, १३ दे. द.

वाडेकर, १४ म. रा. पाळंदे, १५ कृ. ग. लिमये, १६ गं. मा. निरंतर, १७ गो. ग. माल्शे, १८ द. वि. देवधर, १९ दि. वि. केळकर, २० ह. श्री. शेणोलीकर, २१ गं. व. ग्रामोपाध्ये, २२ न. रा. पारसनीस, २३ स. रा. भट, २४ रा. ने. शहा, २५ अ. म. जोशी, २६ मु. डी. गंधे, २७ शं. गो. साठे, २८ वा. दा. गोखले.

(१) चिटणीसांनी मागील सभेचा वृत्तान्त वाचून दाखविला. रा. कृ. गो. मराठे यांनी त्या सभेंत विचारासाठी जो ठराव पाठविला होता त्याचा समावेश या वृत्तान्तांत व्हावा अशी श्री. गो. ग. माल्शे यांनी सूचना केली, व ती सभेने मान्य केल्यानंतर व हा ठराव चिटणीसांनी योग्य त्या ठिकाणीं दाखल केल्यानंतर सभेचा हा वृत्तान्त सर्वानुमतें मान्य करण्यांत आला.

(२) या सभेपूर्वी भरलेल्या नियामक मंडळाच्या सभेंत दुरुस्त्याचा जो ठराव संमत झाला तो या सभेने संमत केला.

(३) १९४२ चे हिशेब मान्यतेसाठी सभेंत मांडण्यांत आले. श्री. ग. गं. जांभेकर यांनी कांही बाबींसंबंधी खुलासा विचारला तो त्यांस मिळाल्यानंतर हे हिशेब सभेनें मंजूर केले.

(४) १९४३ या वर्षासाठी हिशेबतपासनीस म्हणून श्री. म. वि. गोखले व केतकर आणि कंपनीचे श्री. केतकर यांची योजना व्हावी अशी श्री. नी. शं. नवरे यांनी सूचना केली तीस श्री. वा. शि. नाशीक यांनी अनुमोदन दिल्यानंतर ही सूचना सर्वानुमतें मान्य झाली.

(५) नाशिक संमेलनांतील ठरावांच्या अंमलबजावणीचें काम कार्यालयातर्फे चालू असल्याबद्दलची माहिती चिटणीसांनी सभेस दिली.

(६) मागील साधारण सभेने श्री. कृ. गो. मराठे यांच्या पत्राचा विचार बेमुदत तहकूब केला होता. हें पत्र विचारासाठी सभेपुढे चिटणीसांनी आणलें, परंतु या पत्राचा विचार मागील सभेने बेमुदत तहकूब केल्याने व रा. मराठे यांजकडून हें पत्र या सभेंत विचारांत घेतलें जावें अशी पुन्हा सूचना न आल्यामुळे या पत्राचा विचार सभेस करतां येत नाही असा अध्यक्षांनी निर्णय दिला.

वरील कामें झाल्यानंतर अध्यक्षांनी सभा विसर्जन केली.

---

# परिषद्वार्ता



(चिटणिसांकडून)

मागील परिषद्वार्ता लिहिल्यानंतर कार्यकारी मंडळाच्या ता. १ जून व ११ जुलै या दिवशीं सभा झाल्या व ता. २९ जुलै दिवशीं अेक विशेष सभा घेण्यांत आली.

ता. १ जून या दिवशीं भरलेल्या सभेंत नाट्यशतसांवत्सरिक अुत्सवसमितींत परिषदेचे प्रतिनिधि म्हणून परिषदेचे अेक चिटणीस श्री. वा. दा. गोखले यांस नियुक्त करण्यांत आलें.

ता. ११ जुलैच्या सभेंत खालील कामें झालीं:--

(१) विशारद परीक्षेचीं प्रमाणपत्रें उत्तीर्ण विद्यार्थ्यांस द्यावयाचीं तीं परिषदेने अेखादा असा समारंभ योजून त्यांत द्यावीत असें ठरविण्यांत आलें.

ता. २९ जुलै दिवशीं भरलेल्या सभेत खालील दुखवट्याचा ठराव झालाः—

"महाराष्ट्रांतील अेक विद्वान् साहित्यिक, त्यागी देशभक्त, श्रेष्ठ तत्वज्ञानी, राष्ट्रीय शिक्षणाचे पुरस्कर्ते, स्त्रीशिक्षणक्षेत्रातील अेकनिष्ठ कार्यकर्ते प्राचार्य वामन मल्हार जोशी यांच्या शोचनीय निधनामुळे म. सा. परिषदेच्या कार्यकारी मंडळास अत्यंत दुःख होत आहे. मराठी वाङ्मयांत 'काव्य-शास्त्र-विनोद' यांचा सुंदर संगम करून महाराष्ट्रापुढे विशिष्ट ध्येय ठेवण्याचें श्रेय प्राचार्य जोशी यांना द्यावें लागतें. वामनराव जोशी यांचे 'रागिणी', 'सुशीलेचा देव', 'साक्रेटिसाचे संवाद', 'नीतिशास्त्रप्रवेश' वगैरे ग्रंथ मराठी वाङ्मयांत निःसंशय चिरंतन स्वरूपाचे ठरतील. मडगांव येथील महाराष्ट्र साहित्य संमेलनाच्या अधिवेशनाचें अध्यक्षस्थान वामनरावांस देण्यांत आलें होतें. कार्याध्यक्ष या नात्याने त्यांनी सहा वर्षे यशस्वी रीतीने म. सा. परिषदेचें मार्गदर्शन केलें व गेल्या जानेवारीपासून परिषदेचे ते अध्यक्षहि झाले होते. वामनराव जोशी यांच्या निधनामुळे मराठी वाङ्मयाची व विशेषतः म. सा. परिषदेची हानि झाली आहे. त्यांच्या कुटुंबीयांच्या दुःखांत परिषदेचें कार्यकारी मंडळ सहभागी आहे."

**संमेलन**— यंदा मराठी रंगभूमीचा शताब्दिमहोत्सव व नाट्यसंमेलनहि सांगलीस भरावयाचें निश्चित झाल्याने साहित्य संमेलनाचें अधिवेशनहि भरविणें सुलभ होअील अशा आशयाचें प्रा. कानेटकर यांजकडून नुकतेंच लिहून आलें. या पत्राचा विचार होअून "म. सा. संमेलनाच्या कार्यक्रमास निदान दीड दिवस सलग मिळत असल्यासच कार्यकारी मंडळास सांगलीस यंदा संमेलन भरविण्यास संमति देतां येअील" हा कार्यकारी मंडळाचा ठराव प्रा. कानेटकर यांस कळविण्यांत आला. परिषदेचे चिटणीस श्री. वा. दा. गोखले सांगलीस जाणार असून तेथील कार्यकर्त्यांशीं विचारविनिमय झाल्यानंतर संमेलनाच्या निश्चितीबद्दल अधिक लिहितां येअील.

**वाङ्मयसंमेलन**— नाशिक येथील म. सा. संमेलनांतील ठराव ८ अन्वयें म. सा. परिषदेने या वर्षी अितिहास या विषयावर अेक वाङ्मयसंमेलन भरविण्याची योजना केली व हें संमेलन ता. १ व २ जून दिवशीं रियासतकार रा. ब. गो. स. सरदेसाअी यांच्या अध्यक्षतेखाली भरविण्यांत आलें. संमेलनांत अध्यक्ष-स्वागताध्यक्षांच्या भाषणांखेरीज (१) अितिहास व ललितवाङ्मय, (२) अितिहास व शैक्षणिक अभ्यासक्रम, (३) अितिहास व लोकशिक्षण या तीन विषयांवर चर्चा ठेविली होती. पहिल्या विषयावर श्री. न. चिं. केळकर, श्री. रा. म. आठवले, श्री. के. नारायण काळे अित्यादींचीं, दुसऱ्या विषयावर श्री. वि. द. घाटे, श्री. वि. पां. बोकील, प्रा. रा. वि. ओतुरकर अित्यादींचीं, व तिसऱ्या विषयावर प्रा. द. वा. पोतदार, प्रा. त्र्यं. शं. शेजवलकर, डॉ. शं. दा. पेंडसे अित्यादींचीं चर्चात्मक भाषणें झालीं. या संमेलनाचा मुख्य हेतु शास्त्रीय चर्चा करणें व तद्विषयक अेखादा प्रत्यक्ष कार्यक्रम योजणें हा असल्याचें नाशिक संमेलनाच्या ठरावांत नमूद आहे. या हेतूंपैकी पहिला हेतु साध्य होण्याच्या कामीं या संमेलनामुळे चालना मिळाली असें म्हटलें तर ती अतिशयोक्ति होणार नाही. परगांवीं असल्यामुळे ज्यांना अुपस्थित राहतां येणें शक्य नाही अशा सुमारें ५० विद्वानांना त्यांचे विचार लिहून पाठविण्याबद्दल विनंती केली होती. श्री. गो. गो. मुजुमदार अुर्फ साधुदास अित्यादि विद्वानांकडून प्रबंध लिहून आले होते, व ते वाचण्यांतहि आले. संमेलनाध्यक्ष

रा. ब. सरदेसाअी यांचें समग्र भाषण कागदाच्या दुर्मिळतेमुळे देतां आलें नाही. परंतु त्यांतील महत्त्वाचे अुतारे या अंकीं अितरत्र देण्यांत आले आहेत.

परीक्षा— अभ्यासकांच्या सोयीसाठी 'प्राज्ञ' व 'विशारद' या परीक्षांच्या शिक्षणाचे वर्ग आठवड्यांतून पांच दिवस परिषदेच्या अिमारतींत भरतात. यंदा स्वतःच्या अिमारतींत वर्ग भरविण्याची व्यवस्था करणें सुलभ झाल्याने व अनेक शिक्षकांचें व प्राध्यापकांचें या कामीं नियमित व निश्चित साहाय्य मिळत असल्याने यंदा या अभ्यासवर्गास बरेच अभ्यासक आस्थेने हजर राहतात. प्राज्ञ परीक्षेच्या वर्गास जवळ जवळ १०० वर अभ्यासक हजर असतात या गोष्टीचा येथे प्रामुख्याने अुल्लेख केला पाहिजे. या वर्गाच्या अध्यापकवर्गात प्रा. गं. बा. सरदार, श्री. वा. दा. गोखले, श्री. गं. भा. निरंतर, श्री. म. ना. अद्वंत, श्री. ह. श्री. शेणोलीकर, श्री. श्री. र. भिडे, श्री. वि. य. जोशी, श्री. झोळ, श्री. द. ना. कानेगांवकर, श्री. पंडित अित्यादि अध्यापक असून त्यांच्या साहाय्यामुळेच वरील वर्गाची यशस्विता सिद्ध होत आहे.

परिषदेतर्फे चालविलेल्या वर्गांखेरीज बृहन्महाराष्ट्रांत हैदराबाद, पंढरपूर, अिंदूर, मुंबअी, बेळगांव, औरंगाबाद, सांगली अित्यादि ठिकाणींहि वरीलप्रमाणे वर्ग चालविले जात आहेत.

अितर अुपक्रम—

(स्वाध्याय मंडळ) 'प्राज्ञ' व 'विशारद' परीक्षांच्या अभ्यासकांस वाङ्मय, भाषा, कला अित्यादिविषयक सर्वसामान्य माहिती होअून त्यांचा बौद्धिक दर्जा वाढावा या हेतूने या मंडळाची योजना केलेली आहे. या मंडळाच्या वतीने त्या त्या विषयावरील अधिकृत विद्वानांचीं व्याख्यानें प्रत्येक शनिवारीं केलीं जातात. आतापावेतो 'कला व सामाजिक जीवन' या विषयावर श्री. के. नारायण काळे यांचें अेक व 'टीकाशास्त्र आणि वाङ्मयीन मूल्यें' या विषयावर श्री. रामचंद्र शंकर वाळिंबे यांचीं पांच याप्रमाणे व्याख्यानें झालीं. अद्यापि कांही व्याख्यानें व्हावयाचीं आहेत. 'प्राज्ञ' व 'विशारद' या परीक्षांसाठी अभ्यास करणाऱ्यांखेरीज या व्याख्यानास ५०-७५ अितर अभ्यासकहि हजर असतात यावरून या व्याख्यानांची अुपयुक्तता सिद्ध होत आहे.

संकीर्ण— वाङ्मयसंमेलनाचा प्रसंग साधून परिषदेने प्रा. द. वा. पोतदार यांजकडून लिहवून घेतलेल्या 'म. सा. परिषदेचा अितिहास' ह्या ग्रंथाचें प्रकाशन ता. २ जून दिवशीं करण्यांत आलें. याच दिवशीं वार्षिक स्नेहसंमेलनादि कार्यक्रम झाला.

परिषदेचे अध्यक्ष प्रि. वामन मल्हार जोशी यांच्या शोचनीय निधनाबद्दल दुखवट्याची जाहीर सभा परिषदेच्या वतीने व अितर संस्थांच्या सहकार्याने डॉ. अण्णासाहेब कर्वे यांच्या अध्यक्षतेखाली ता. ३० जुलै दिवशीं टिळक स्मारक मंदिरांत घेण्यांत आली. सभेस अुपस्थितांची संख्या ५००।६०० होती. सभेंत डॉ. सर रघुनाथराव परांजपे, प्रा. पोतदार, श्री. न. चिं. केळकर, प्रा. माटे, श्री. वि. द. घाटे, प्रि. ध. रा. गाडगीळ, श्री. दा. वि. गोखले, प्रा. रा. श्री. जोग, श्री. तळवलकर, श्री. निरंतर, कु. लीला मोघे अित्यादींचीं भाषणें झालीं. या प्रसंगीं महाराष्ट्रांतील अनेक संस्थांनी व थोर गृहस्थांनी पत्रें पाठवून कै. वामनरावजींबद्दल आपला आदर व्यक्त केला होता.

# नवीन सभासद

## आश्रयदाते

श्रीमंत राजे मेजर मालोजीराव नाईक निंबाळकर, फलटण

## साहाय्यक

रा. सा. शंकर रामचंद्र पन्हाळे, पुणें

## हितचिंतक

१ श्रीमंत सरदार माधवराव आनंदराव रास्ते, पुणें
२ श्री. हरि गोविंद गोखले, गोरेगांव (तहहयातांतून)
३ ,, श्रीधर रामजी शिंदे, मेहसाणा (तहहयातांतून)

## तहहयात

१ रा. ब. गोविंद सखाराम सरदेसाई कामशेत
२ श्री. गंगाधर देवराव खानोलकर, मुंबई
३ ,, यशवंत दिनकर पेंढरकर, पुणें
४ ,, ना. ब. जोशी, विजापूर
५ ,, बाबूराव अेन. ठाकूर, पुणें
६ रावबहादुर वंडेकर, नाशिक
७ श्री. ग. ह. दरवडे, पुणें
८ ,, य. गो. जोशी, पुणें

## तहहयात (साधारणांतून)

१ आचार्य प्रल्हाद केशव अत्रे पुणें
२ श्री. गो. ग. मालशे ,,
३ ,, शं. प्र. गोरे ,,
४ ,, कृ. मो. सहस्त्रबुद्धे ,,
५ श्री. ग. बा. बोरवणकर पुणें

## साधारण

१ सौ. प्रभावती मालचंद्र जोशी, पुणें
२ श्री. भगवान् गंगाधर चोळकर, कल्याण
३ ,, सदाशिव रामचंद्र घारे, जमखंडी
४ ,, वीरेंद्र द्वारकादास अढिया, डहाणू (जि. ठाणें)
५ ,, गोपाळ बालाजी बीडकर, कुंथलगिरी
६ ,, धोंडो वामन टिल्लू, ठाणें
७ ,, भिकाजी रामचंद्र मेतर, परेळ
८ ,, रघुनाथ अनंत अडके, देवास (थो.)
९ ,, महादेव भाऊ मायनेकर, वसई
१० डॉ. हरि लक्ष्मण वझे, विजापूर
११ श्री. वि. म कुलकर्णी, पुणें
१२ ,, लक्ष्मण सखाराम केळकर, पुणें
१३ ,, हेमन्त रामचंद्र खरे ,,
१४ ,, वामन वासुदेव चितळे ,,
१५ डॉ. सोनू लक्ष्मण चिंचणकर ,,
१६ श्री. के. सी. भिडे ,,
१७ श्री. कमला कानेटकर ,,
१८ कु. वत्सला गणेश भाटे ,,
१९ ,, वेणू गोविंद मोडक ,,
२० सौ. सुधाबाई गुत्ते ,,
२१ ,, इंदिरा अनंत मायदेव ,,
२२ श्री. मारुती मल्लय्या जक्कल ,,
२३ ,, शान्ताराम पापय्या बंडेलू ,,
२४ प्रा. बळवंत नारायण जोशी, नाशिक

### चुकीची दुरुस्तीः—

मागील अंकांत (अंक ६६) साधारणांतून तहहयात सभासदांत प्रा. पुरुषोत्तम विश्वनाथ बापट, लश्कर (ग्वाल्हेर), याअैवजी प्रा. प्रभाकर वासुदेव बापट, लश्कर (ग्वाल्हेर), असें पाहिजे.

———

# संपादकीय

सहा महिन्यांपूर्वी ज्या हाताने प्रा. वामनराव जोशी यांच्या षष्ट्यब्दपूर्तीच्या निमित्ताने अभिनंदनपर आणि सदिच्छा व्यक्त करणारे शब्द लिहिले, त्याच्यावर अितक्या योड्या कालाने त्यांच्या निधनामुळे झालेलें दुःख व्यक्त करण्याचा प्रसंग यावा हा भवितव्यतेचा शापच होय. त्या वेळीं महाराष्ट्रांतील सुबुद्ध जनतेने अेकमुखाने त्यांना आयुरारोग्य चिंतून आशीर्वाद दिले. पण जनतेच्या या सदिच्छांना किंवा आशीर्वचांना कांहीच किंमत न देतां निर्दय काळाने त्यांना आपल्यामधून ओढून नेलें आहे. आमच्या शुभेच्छा आणि अभिनंदनें पोकळ शब्द ठरले. केशवसुत म्हणतात त्याप्रमाणे शब्दांत पूर्वी असलेलें तेज आम्हीं मानवांनी आपल्या वागणुकीने मळवून टाकलें असून आमचे शाप आता कोणास मारूं शकत नाहीत तसें आमचें 'आशीर्वचहि न कोणा तारी' अशी आपली स्थिति झाली आहे. साठीच्या निमित्ताने त्यांना जी कांही थैली अर्पण करण्यांत येत होती तीमधील द्रव्याचा पहिला विनियोग म्हणून कै. वामनराव म. सा. परिषदेचे तहहयात समासद नुकतेच झाले होते. त्या तह-हयात शब्दाला हा अर्थ असेल अशी त्यांना आणि त्यांना तहहयात समासद करून घेणारांना मुळीच कल्पना नव्हती. भवितव्यता मात्र या आमच्या व्यवहाराची व आमची कींव करून हसत असावी.

म. सा. परिषदेचे ग्रह खरोखर अनिष्ट असले पाहिजेत. तिचे अेक विश्वस्त कै. रा. ब. दा. ग. पाध्ये निवर्तल्याला वर्षहि लोटलें नाही. त्यांच्या निधनानिमित्त झालेल्या दुखवट्याच्या सभेस कै. वामनरावच अध्यक्ष होते. आता परिषदेचे अध्यक्षच दिवंगत झाले. परिषदेच्या कारभारांत गेलीं सहा वर्षे कार्याध्यक्ष या नात्याने सर्व प्रकारच्या कार्यकर्त्यांस त्यांनी संभाळून नेलें. परिषदेचें कोणतेंहि लहानमोठें कार्य स्वतःच्या घरचें मानून प्रकृतीचें अस्वास्थ्य कधीहि पुढे न करतां अत्यंत आपुलकीने केलें. आता अध्यक्षपदावरून, तिच्या दररोजच्या व्यापाचा त्रास न होतां, तिचें मार्गदर्शन त्यांना सुखाने करतां येअील अशी आशा होती. पण ती पूर्ण व्हावयाची नव्हती.

पण म. सा. परिषदेपेक्षा महाराष्ट्र-साहित्याची झालेली हानि अपरिमित आहे. साठी अुलटली तरी आपल्यामधील वाङ्मयीन गुण कोणत्याहि प्रकारें क्षीण झाले नव्हते यांचा प्रत्यय त्यांनी 'स्मृतिलहरीं'मधून आणून दिला होता, व 'वाङ्मयीन महात्मता' या ग्रंथास लिहिलेल्या प्रस्तावनेने आपली विचक्षण टीकाबुद्धीहि कार्यक्षम असल्याचें दाखवून दिलें होतें. या परिपक्व गुणांचा खरा फायदा यापुढेच त्यांना मिळणाऱ्या स्वास्थ्यांत मराठी साहित्याला लाभेल अशी आशा होती. यापुढे ललितलेखनाअैवजी विद्वत्तेचें कार्य आपल्या हातून व्हावें अशी त्यांची स्वतःची व अितरांची अिच्छा होती. तें करण्याचें सामर्थ्य त्यांच्या ठिकाणीं होतें यांत शंका नाही. तथापि त्यांचें तें वैशिष्ट्यपूर्ण ललितलेखनच या विद्वत्तेच्या कार्यापेक्षा अधिक अुपयुक्त व महत्त्वाचें आहे. तत्त्वज्ञान, नीतिशास्त्र किंवा मनोविश्लेषण यांवरील



अनुक्रमणिका

अेखादा जाडा ग्रंथ लिहिण्यापेक्षा या सान्यांचें व्यवहारांतील कार्य त्यांच्या ललितलेखनांत जें व्यक्त झालें आहे तेंच खरोखर आल्हाददायक आणि त्याबरोबरच अुद्बोधकहि झालें आहे. शास्त्रांचा विचार त्यांच्या व्यावहारिक अुपपादनावांचून व्यर्थच म्हणावयास हवा. तें व्यावहारिक अुपपादन कै. वामनरावांच्या ललितलेखनांत जेवढें आढळतें तेवढें अितर कोणाहि ललितलेखकाच्या लेखनांत आढळत नाही. ललितलेखकास आवश्यक असणारी मानवजातिविषयक व्यापक सहानुभूति त्यांच्या वाङ्मयांत भरून अुरली आहे. या सहानुभूतीमुळे सनातनी आणि सुधारक, जहाल आणि मवाळ, टिळकपंथी आणि गांधीपंथी, संसारी आणि स्वातंत्र्यवादी स्त्री, कलासक्त आणि ध्येयवादी अितिहाससंशोधक यांची मनोरचना त्यांना आकलतां येअी व त्यांचें सूक्ष्म मनोविश्लेषण करतां येअी. त्यांचें मानसशास्त्राचें ज्ञान सान्याच व्यक्तींच्या गुणदोषांचें चौफेर आकलन करण्यास त्यांना अुपयुक्त होअी, व तत्त्वज्ञानाचा अभ्यास सान्या जीवनाचा खरा अर्थ लावण्यास साहाय्य करी. मनुष्यस्वभावांतील अनेक सूक्ष्म पण सहज अशा विसंगतींच्या दर्शनावर आधारलेला आणि व्यापक सहानुभूतीमध्ये बुचकळून निवालेला त्यांचा विनोद मोठा निरागस, सोज्ज्वळ व खरोखर अुच्च दर्जाचा ठरतो. मानवाचे दोष दिसत असूनहि त्याच्या मूलभूत चांगुलपणावर त्यांचा विश्वास होता, म्हणून त्यांच्या वाङ्मयांत स्पृहणीय असा आशावाद असे. सत्याचा आग्रह, पण प्रतिपादनामध्ये अनाग्रह; देवधर्मविषयक अज्ञेयवाद, पण माणसाचा देव होअू शकेल असा आशावाद; तत्त्वज्ञानांची बैठक आणि ललितवाङ्मयांत कामगिरी असें कांही अपूर्व मिश्रण त्यांच्या व्यक्तिमत्वांत झालेलें होतें, व त्याचें प्रतिबिंब त्यांच्या वाङ्मयांत अुतरलें होतें. साहित्यिक या नात्याने असलेल्या त्यांच्या व्यक्तिमत्वांत आदर्श सुसंस्कृत व्यक्ति म्हणून असलेल्या त्यांच्या मोठेपणाची भर पडली होती. निरहंकारी वृत्ति, खिलाडूपणा, निरागस विनोद, साधी राहाणी, अुच्च विचारसरणी, आणि सर्वांत अधिक म्हणजे सच्छील या गुणांनी ते आबालवृद्धांस हवेसे वाटत. सेवानिवृत्तीच्या कालांत त्यांनी साहित्यनिर्मिति केली नसती तरी व्यक्ति या नात्याने त्यांची लोकप्रियता अबाधितच राहिली असती. जन्मभर फारसें न लाभलेलें स्वास्थ्य यापुढे त्यांना मिळावें अशीच सान्यांची अिच्छा होती. अीश्वर तें त्यांच्या आत्म्यास देवो अशी प्रार्थना, त्यांची स्वतःची या दोन्ही गोष्टींविषयींची वृत्ति माहीत असूनहि आम्ही करतों.

* * *

गेल्या तिमाहींत आणखी दोन प्रथितयश लेखकांचे अेकसष्टीचे समारंज साजरे करण्यांत आले. श्री. भा. वि. वरेरकर व श्री. वि. दा. सावरकर या दोघांचेंहि वाङ्मयीन कार्य मोठें आहे. साहित्याकरिता साहित्य अशी वृत्ति दोघांचीहि नाही. आजच्या महाराष्ट्रीय जीवनांतील दोषास्पद भागावर बोट ठेवून त्यांत कोणत्या दृष्टीने सुधारणा होणें आवश्यक आहे हें सांगण्याचें कार्य दोघांनीहि केलें आहे. नाटक, कादंबरी, लघुकथा हीं स्त्रियांची वकिली करण्याचीं प्रभावी साधनें म्हणून श्री. वरेरकर त्यांचा अुपयोग करतात, तर दे. भ. सावरकर काव्य-नाटक-कादंबरी यांचा अितर गद्यलेखनाबरोबर राष्ट्रीय वृत्तीच्या परिपोषार्थ अुपयोग करतात. दोघांच्याहि लेखनांत त्यांच्या ध्येयानुरूप अभिनिवेश व आवेश आहे, व त्यामुळे त्यांचें लेखन परिणामकारक ठरतें. या अभिनिवेशामुळेच कीं काय, कै. वामनरावांची व्यापक सहानुभूति त्यांच्या लेखनांत दिसून येत नाही. आग्रह, अेका बाजूचें प्रतिपादन, संपूर्ण सत्यापेक्षा तात्कालीन मर्यादित सत्याचें प्रेम, पण लोकांवर परिणाम करील व त्यांना सहज समजेल व पटेल

अशा तऱ्हेचा युक्तिवाद व भाषाशैली हे श्री. वरेरकरांच्या लेखनाचे विशेष आहेत. दे. भ. सावरकरांचा आग्रह भाषाशैलीपासून तत्त्वप्रतिपादनापर्यंत सारखाच दिसून येतो. साहित्य-निर्मितीस आवश्यक असणारी तळमळ, प्रतिपादनास आवश्यक असणारी विद्वत्ता आणि बुद्धि-सामर्थ्य, आणि आपलीं मतें अवघड भाषेंतहि वाचकांच्या गळीं उतरविणारें लेखनांतील ओज या गुणांनी त्यांचें वाङ्मय जेवढें राष्ट्रोपयोगी तेवढेंच साहित्यदृष्ट्या अभ्यसनीय झालें आहे. हिंदुमहासभेच्या कार्यामुळे अलीकडे त्यांना फारसें लिहितां आलें नाही. आता ते त्यांतून बऱ्याच अंशाने निवृत्त होणार आहेत; तेव्हा जें स्वास्थ्य त्यांना लाभेल त्यापैकीं कांहीं भागाचा उपयोग त्यांनी आपल्या हेतूच्या सिद्ध्यर्थ, व आपल्या पद्धतीने का होईना, वाङ्मय लिहून करावा अशीच अपेक्षा सर्व साहित्यभक्तांची असणार. श्री. वरेरकर आणि दे. भ. सावरकर यांना दीर्घ आयुष्य व आरोग्य लाभून मराठी साहित्याची अधिक सेवा होवो अशी आम्ही, आमच्या सदिच्छांना काय फळ मिळतें याचा नुकताच प्रत्यय आला असतांहि, मनःपूर्वक प्रार्थना करतों.

---

## साभार स्वीकार

१ लढवय्ये—ले० गं. ल. पुजारी; प्रका० दि. मा. घुमाळ, सितावर्डी, नागपूर; मूल्य रु. ३.

२ शककर्ता शालिवाहन—ले० ना. के. बेहेरे; प्रका० दि. मा. घुमाळ, सिता-बर्डी, नागपूर; मूल्य रु. २॥.

३ कुंचवणा—ले० वि. पां. दांडेकर; प्रका० कृ. वा. मराठे, श्रीरामविजय छाप-खाना, बडोदें; मूल्य रु २.

४ चोरटे हल्ले—ले० अनंत अंतरकर; प्रका० व्ही. व्ही. पटवर्धन, ज्योत्स्ना कार्या-लय, फोर्ट-मुंबई; मूल्य रु. १.

५ गाळीव रत्नें—ले० ,, ,, प्रका० महाराष्ट्र ग्रंथ भांडार, कोल्हापूर; मूल्य रु. २.

**प्रका० दा. मा. मोघे, स्कूल ॲन्ड कॉलेज बुक स्टॉल, कोल्हापूर, यांचीं प्रकाशनें:—**

६ अंधारांतील वाट—ले० बा. भ. बोरकर; मूल्य रु. २॥.

७ द्विविभूतिचरितम्—ले० रा. वि. गोखले; मूल्य रु. १.

८ मंगळागौर—ले० ना. धों. ताम्हनकर; मूल्य आ. १२.

प्रका० के. भि. ढवळे, श्री समर्थ सदन, मुंबई, यांचीं प्रकाशनेंः—

९ **सावरकरांची कविता**—कवि० वि. दा. सावरकर; संपा० वा. गो. मायदेव; मूल्य रु. २.

१० **सावरकर-काव्य-समालोचन**—संपा० वा. गो. मायदेव; मूल्य रु. २.

११ **सोव्हिएटच्या समरकथा**—अनु० मा. रा. भागवत; मूल्य रु. १।

१२ **बाल नागरिक भा. १ ते ४**—ले० प्रा. के. गो. पंडित; भाग १ मूल्य आ. ४, भाग २ ते ४ प्रत्येकीं आ. ६.

१३ **महाभारतांतील सोप्या गोष्टी**—ले० गं. म. वैद्य; मूल्य आणे ३.

१४ **रामायणांतील सोप्या गोष्टी**— ,, ,, ४.

१५ **किशोर संगीत**—प्रा० वीरकर व मटंगेबुवा; मूल्य आणे १०.

१६ **हिंदुस्थानांतील नाना लोक**—प्रा० चिं. ब. जोशी; मूल्य आणे ७.

१७ **रवींद्रनाथांचा शिशु**—अनु० रा. ब. म. का. कारखानीस; मूल्य रु. १.

१८ **बालमनाचें रहस्य**—ले० भा. धों. कर्वे; मूल्य रु. १।.

१९ **परामर्श**—ले० गं. त्र्यं. माडखोलकर; प्रका० दि. मा. घुमाळ, सिताबर्डी, नागपूर; मूल्य रु. ३.

२० **आंदोलन**—ले० दा. कृ. पैठणकर; प्रका० महाराष्ट्र ग्रंथ भांडार, गिरगांव, मुंबई; मूल्य रु. ३.

२१ **शैक्षणिक मानसशास्त्र**—ले० श्री. शं. ब. सुखटणकर; प्रका० सौ. लीलावती सुखटणकर, सातारा सिटी; मूल्य रु. २॥.

२२ **विराट मानव**—ले० व प्रका० डॉ. शं. ज़ा. पुरवार; ललित कला विकास मंडळ, सराफा, औरंगाबाद; मूल्य रु. १।.

२३ **सौंदर्यशोध व आनंदबोध**—ले० प्रा. रा. श्री. जोग; प्रका० देशमुख आणि कंपनी, १९१ शनिवार, पुणें; मूल्य रु. ८.

२४ **निर्वासित चिनी मुलास**—ले० आ. रा. देशपांडे (अनिल); प्रका० पु. आ. चित्रे, खारीबाव, बडोदें; मूल्य रु. १.

२५ **सत्कार्योत्तेजक सभा, धुळें. सुवर्ण महोत्सव ग्रंथ**—संपा० ग. शं. देव; प्रका० शं. श्री. देव, धुळें; मूल्य रु.५.

२६ **जयन्ति स्मारक ग्रंथ**—(मंत्री– जयन्ति स्मारक ग्रंथ, विद्यापति हिन्दी सभा, दरभंगा.)

---

# महाराष्ट्र-साहित्य-परिषद्



## व्याख्यान-सत्र

म. सा. परिषदेतर्फे विविध व उपयुक्त विषयांवर त्या त्या विषयांतील तज्ज्ञांचीं व्याख्यानें करण्याची योजना निश्चित झाली आहे. सामाजिक, धार्मिक, तत्त्वज्ञानविषयक अित्यादि अनेक विषयांचें शिक्षण या व्याख्यानद्वारा प्रौढ अभ्यासकांना मिळावें हा या मालेचा प्रमुख हेतु आहे. प्रत्येक विषयावर कमींत कमी तीन व अधिकांत अधिक सहा अशी व्याख्यानांची संख्या राहील. प्रस्तुत व्याख्यानमाला या अभ्यासविषयक असल्यामुळे श्रोतृवर्गाची संख्या नियमित व मर्यादित राहणार हें अुघड आहे.

या व्याख्यानमालेची सुरुवात हिंदुस्थानांतील प्रसिद्ध अर्थशास्त्रज्ञ प्राचार्य **धनंजय रामचंद्र गाडगीळ**, अेम्. अे., अेम्. लिट्., यांच्या व्याख्यानाने होणार आहे. त्यांचा विषय 'युद्धकालीन आर्थिक प्रश्न' हा आहे. अशा तऱ्हेचीं व्याख्यानें प्रा. दत्तो वामन पोतदार, प्रा. श्रीपाद महादेव माटे, प्रा. नरहर रघुनाथ फाटक, प्रा. त्र्यंबक शंकर शेजवलकर, प्रा. कृष्णाजी पांडुरंग कुलकर्णी, प्रा. दत्तोपंत येंडे अित्यादि विद्वानांना देण्याबद्दल विनंती करण्यात आली आहे. प्रस्तुत व्याख्यानमाला अभ्यासवर्गाच्या स्वरूपाच्या असल्यामुळे अुपस्थित राहूं अिच्छिणाऱ्यांकडून स्वल्प शुल्काची अपेक्षा परिषदेने केली आहे. परिषदेच्या सभासदांस प्रत्येक व्याख्यानसत्रास आणे ८, व सभासदेतरांस रु. १ याप्रमाणे शुल्क ठेविलें आहे. या व्याख्यानसत्रांचा फायदा पुण्यांतील व पुण्याबाहेरील अभ्यासू व्यक्ति घेतील अशी आशा आहे. व्याख्यानांचा कार्यक्रम त्या त्या वेळीं जाहीर केला जाईल.

## म. सा. परिषदेच्या व्याख्यानसत्रांतील प्रा. ध. रा. गाडगीळ यांचीं व्याख्यानें

| दिवस | | | | विषय |
|---|---|---|---|---|
| ता. २८ | आगस्ट, | शनिवार | ... | युद्ध्यमान राष्ट्रांचा फडणिशी व्यवहार. |
| ता. २९ | ,, | रविवार | ... | चलनवृद्धि व तिचे परिणाम. |
| ता. ३० | ,, | सोमवार | ... | युद्धकालीन आर्थिक धोरण. |

**स्थळ**— म. सा. परिषदेचें डॉ० माधवराव पटवर्धन साहित्य मंदिर, पुणें २.

**वेळ**— सायंकाळीं ७

**शुल्क**— परिषदेच्या सभासदांस ८ आणे, इतरांस रु. १.

चिटणीस,

**म. सा. परिषद्**

आर्यसंस्कृति मुद्रणालय, चिमणबाग, टिळक रस्ता, पुणें, येथे लक्ष्मण नारायण चापेकर यांनी छापिलें व पुणें येथे महाराष्ट्र-साहित्य-परिषदेच्या कार्यालयांत परिषदेकरिता रामचंद्र श्रीपाद जोग यांनी प्रसिद्ध केलें.